श्रीगुरुः शरणम्।।

# कृपेची साउली
# प.पू.योगिराज गुळवणीमहाराजांचा जीवनपट.

**लेखकः- डॉ. वासुदेव व्यंकटेश देशमुख**[1]

[1] ए1-401, प्रिझम, स्पायसर कॉलेजजवळ, औंध पुणे 411001.
दूरभाष 020-25911006.

# अनुक्रमणिका

श्रीगुरुः शरणम्।।

# कृपेची साउली

## प.पू.योगिराज गुळवणीमहाराजांचा जीवनपट.

### लेखकः- डॉ. वासुदेव व्यंकटेश देशमुख[१]

स्मृतोऽप्यवति यो विघ्नं निघ्नमम्बासुतः स्तुतः। गन्धर्वस्थः स हि कलौ सदा वसतु मे हृदि।।
नमस्ते शारदे देवी वीणावादनतत्परे। सरस्वती जगन्माता सा मे बुद्धिं प्रचोदयात्।।
वासुदेवयतिं वन्दे वामनं मम सद्गुरुम्। कवीश्वरं च दत्ताख्यं याचे मतिप्रकाशनम्।।

**ते हे गोष्टी रम्य। अमृतधारा धर्म्य। करिती प्रतीतीगम्य । आइकोनि जे।। तैसेनि श्रद्धेचेनि आदरे। जयांच्या ठायीं विस्तरे। जीवीं जया थारे। जे अनुष्ठिती।।**

संतांची चरित्रे ही धर्माचा जणुं वस्तुपाठच असतात. भक्तीप्रेमाच्या अमृतधारांनी त्यांचे जीवन पाझरत असते. ह्या कथांचे श्रवण करून जे आचरणांद्वारे त्यांचा प्रत्यय घेतात, त्यांतील तत्त्वज्ञानाचे सादर श्रद्धापूर्वक अनुष्ठान करतात. त्यांच्या अंतःकरणांत ते ज्ञानबीज मूळ धरते आणि यथाकाल त्याचा वृक्ष विस्तारून आनंदरूपी फळांनी बहरतो. एवढ्यासाठी त्यांची परमपवित्र चरित्रे सादर वर्णावीत आणि ऐकावीत. याच हेतूने प.पू. योगिराज संत श्री वामनरावजी गुळवणी महाराज यांच्या चरित्राचे हे विहंगमावलोकन आरंभिले आहे.

### कुलपरंपराः पणजोबा वे.मू.नागेशभटजींवर श्रीनारायणस्वामींची कृपा

दक्षिण महाराष्ट्र आणि कोंकण यांच्या सीमेवर, कोल्हापूर जिल्ह्यांत राधानगरी तालुक्यांत भोगावती नदीच्या निसर्गसंपन्न खोऱ्यांत, डोंगरांच्या कुशीत कौलव हे छोटेसे गांव आहे. दोनशे वर्षांपूर्वी इथे गुळवणी नांवाचे देशस्थ ऋग्वेदी शाकलशाखीय घराणे वसत होते. हे वासिष्ठगोत्रीय वैदिक ब्राह्मण अत्यंत निष्ठावंत आणि आचारसंपन्न होते. वेदमूर्ति नागेशभटजी हे आपल्या चरित्रनायकांचे पणजोबा त्या काळांत सुखवस्तु होते. कौलव गांवांत

[१] ए1-401, प्रिझम, स्पायसर कॉलेजजवळ, औंध पुणे 411001.
दूरभाष 020-25911006.

तेवढेच एक ब्राह्मणाचे घर होते. वाडीला ज्यांची महापूजा देवांच्याही आधी होते ते महान दत्तभक्त प.प.श्रीनारायणस्वामी हे नागेशभटजींचे सद्‍गरु! एकदां देवी महालक्ष्मीच्या आज्ञेने कौलवजवळच्या दुर्गमान पर्वतावरील विजयादेवीच्या मंदिराला जातांना कौलव गांवांत वे.नागेशभटजींकडेच थांबले होते. नागेशभटजींनी त्यांची सर्व व्यवस्था उत्तम करून त्यांना आवश्यक ते सर्व साह्य केले. विजयादेवीच्या मंदिरांत श्रीनारायणस्वांमींकडे एक मोठा वाघ आला. त्याच्या दुखावलेल्या पायावर श्रीस्वामींनी उपचार करून त्याला दुःखमुक्त केले. त्या वेळी नागेशभटजींना कांही संतान नव्हते. पढे श्रीस्वामींच्या आशीर्वादाने त्यांना पुत्र झाला त्याचे नांव नारायण असे ठेवले. हे श्रीगुरुमहाराजांचे आजोबा. यांच्या चार पुत्र व तीन कन्या यांतील ज्येष्ठ वेदमूर्ती दत्तंभट. ह्यांच्या प्रथम पत्नी सौ.उमा यांना सात अपत्ये झाली, पण एकही जगलें नाही. त्या दुःखाने खचलेल्या उमाबाईंचेही लवकरच प्राणोत्क्रमण झाले. वे.दत्तंभटजींनी वंशवृद्धीसाठी जवळच्याच हिरवडे गांवाच्या मारुतीराव कुलकर्णी यांच्या एकुलत्या एका कन्येशी दुसरा विवाह केला. विवाहानंतर दत्तंभटजींनी कौलव गांव सोडले व कुडुत्रीला आपला नवा संसार सुरूं केला.

## आईवडिलांची पुण्याई.

इथेही दत्तंभटजींनी आपला वंशपरंपरेने चालत आलेल्या पौरोहित्याचीच वृत्ती चालवली. दत्तंभटजी हे पंचमहायज्ञ करणारे आणि आजीवन अग्निपरिचर्या करणारे आचारसंपन्न वैदिक ब्राह्मण होते. याशिवाय कुलपरंपरेनुसार श्रीदत्तोपासना व नित्य भजनपूजनही होत असे. सात्त्विक, सगुण आणि सुरूप सौ.उमाबाईंचीही त्यांना पूर्ण साथ होती. पतिपत्नींचा प्रत्येक पौर्णिमेला घोड्यावर बसून श्रीक्षेत्र नरसोबावाडीला जाऊन मनोहर पादुकांचे दर्शन-पूजन करण्याचा नियम होता. श्रीदत्तकृपेने त्यांना यथाकाल चार पुत्र झाले. शंकर, बापू, नरहरी आणि गोविंद अशी त्यांची नांवे ठेवली. घरची स्थितीही सुखसमृद्धीची होती. पण दोघांही पतिपत्नींचे चित्त प्रपंचांत रमत नव्हते. त्यांना एकच ध्यास होता की आपल्या साक्षात् श्रीनृसिंहसरस्वतीस्वामीमहाराजांकडून प्रासादिक पादुका मिळाव्यात.

चित्तांतली तळमळ व अनुष्ठानाची तीव्रता वाढतच गेली..अशांतच सौ.उमामातांना पांचव्यांदा दिवस गेले. दत्तजयंतीच्या वारीला ह्या वेळी सौ.उमाबाईंना जातां आले नाही. एकटे दत्तंभट (आबा) वाडीला जाऊन आले. दरवर्षीप्रमाणे त्यांनी पहांटे स्नान करून देवाच्या पादुकांवर पाणी घातले. या वेळी पाणी घालतांना गाभाऱ्यांतून “मी तुमचेवर प्रसन्न आहे” असे शब्द त्यांना ऐकायला आले. दत्तंभटजींना परमानंद झाला. घरी आल्यावर त्यांनी हा अनुभव पत्नीला सांगितला. त्यांनाही धन्यता वाटली.

## पादुकांचा प्रसाद.

आसन्नप्रसूत अवस्थेतच उमाबाईंची प्रसादपादुकाची इच्छा इतकी तीव्र झाली की त्यांनी प्रायोपवेशनच सुरू केले. घरांतील स्वयंपाकादि आवश्यक कामे आटोपून अन्नपाणी वर्जून त्या दिवसरात्र देवापुढेच जप व प्रार्थना करीत बसून रहात. ४/५ दिवसांत फारच अशक्तपणा आला.गृहकृत्यें करण्याचेही त्राण राहिले नाही. मग ते सर्व शंकरशास्त्रींवर सोडून उमाबाई सारख्या देवापुढेच बसून राहत व रात्री तिथेच झोंपत. त्यांच्या करारी व निश्चयी स्वभावामुळे त्यांना परावृत्त करणे कुणालाच शक्य झाले नाही. सातव्या दिवशी दुपरी बाराची वेळ होती. उमाबाई ग्लानीतच देवासमोर बसल्या होत्या. इतक्यांत त्यांना आपल्या मांडीवर कांही तरी पडल्याचा आवाज आला. डोळे उघडून पाहतांच एक कागदाची पुडी दिसली. उघडतांच त्या पुडीत अष्टगंध लावलेल्या चांदीच्या छोट्याशा पादुका (दोन सें.मी.) दिसल्या. चमकून त्यांना दाराकडे पाहिले तर एक भव्य व तेजस्वी संन्यासी त्वरेने बाहेर जातांना पाठमोरे दिसले. त्यांनी आनंदातिशयाने शंकरशास्त्रींना हांक मारली आणि पादुकाप्रसाद मिळाल्याचे सांगितले आणि त्यांना त्या स्वामींच्या शोधाला पाठविले. पण त्वरेने जाणारे स्वामी पाहतां पागतां अदृश्य झाले! आबा नित्याप्रमाणे ब्रह्मयज्ञाला नदीवर गेले होते. परत आल्यावर त्यांना ही आनंदाची वार्ता समजली. त्यांनी देवाला नैवेद्य केला उमाबाईंनी आपल्या उपवासाचे पारणे केले.

## कुडुत्री येथे वे.मू.दत्तंभटजी व सौ.उमामातांच्या पोटी जन्म

अशा ह्या अलौकिक शुभसूचक घटनांच्या पार्श्वभूमीवर श्रीदत्तजयंतीनंतर साधारण दोन आठवड्यांनी **मार्गशीर्ष व।।१३ शके १८०८ (२३ डिसेंबर,१८८६)** गुरुवारी रात्री ८:१९ ला उमाबाई प्रसूत होऊन त्यांनी पुत्ररत्नाला जन्म दिला. हेच आपले चरित्रनायक होत. कुडुत्रीचे घर ऐसपैस होते. पुढेमागे आंगण, मध्येदोन सोप्यांमध्ये माजघर, परस असे घर होते. घरांत गाई-म्हशी होत्या. परसांत भाजीपाला होई. घरची शेती होती. कुटुंब खाऊन-पिऊन सुखी होते. ह्या घरांतच वामनचे बालपण व्यतीत झाले.

# उमामातांचा आजार.

वामननंतर उमामातांना तीन मुलीच झाल्या. तानी, गोदावरी आणि सखू. सखूच्या गरोदरपणांत उमाबाईंच्या पोटांत एक गांठ (गुल्म) होऊन ती बरीच मोठी झाली. मिरजेच्या दवाखान्यांत कर्करोगाचे निदान झाले. तेव्हां उमाबाईंनी 'पडतां जडभारी, दासे आठवावा हरी' या संतवचनानुसार वाडीला राहून देवाची सेवा करीत आल्या प्रसंगाला सामोरे जाण्याचा निर्धार केला. त्यांच्याबरोबर शंकरशास्त्री राहिले. त्यांनी गुरुचरित्राची पारायणे सुरू केली. एके दिवशीं (आश्विन शु।।३, इ.स.१८९३) उमाबाई माध्याह्नकाळी स्वयंपाक करीत असतांना त्यांना शंकरशास्त्री एका स्वामींना घेऊन येतांना दिसले. 'ऐन भिक्षेच्या वेळी कुणा स्वामींना आणले?' असा विचार मनांत येतो न येतो तोंच त्या स्वामींनी पुढे येऊन त्यांना तीर्थ दिले. तीर्थ घेतांना उमाबाईंनी त्यांना विचारले, "हे दुखणे बरे होईल का, महाराज?" यति म्हणाले, "रोगाची गांठ आहे, जाईल फुटून," आणि झटकन् डावीकडे वळून दुसऱ्या दरवाज्याने जवळच्या नारायणस्वामींच्या देवळाकडे गेले. ते तीर्थ घेतांच उमाबाईंची शुद्ध हरपली. थोड्याच वेळाने शंकरशास्त्री ब्रह्मयज्ञ करून परतले तों त्यांना आपली आई रक्ताच्या थारोळ्यांत पडलेली दिसली. त्यांच्या पोटांतील ते गुल्म फुटून ते सर्व रक्त सगळीकडे पसरले होते. उमाबाई चार-पांच तास बेशुद्धच होत्या. शुद्ध आल्यावर शेजारच्या दुर्गामावशींनी त्यांना नदीवर नेऊन आंघोळ घातली. ही सर्व घटना त्याच

दिवशी एका पत्राने शंकरशास्त्रींनी तीं. आबांना कळविली. पुढे गुरुद्वादशीचा प्रसाद घेऊन मायलेक घरी परतले.

## शिक्षण.

यानंतर वर्षाभरांतच (इ.स.१८९४) वामनची मुंज झाली. मुंजीनंतर त्याचे धार्मिक शिक्षण घरांतच सुरू झाले. संध्या, पूजा, वैश्वदेव, पुरुषसूक्त, श्रीसूक्त इत्यादींच्या संथा तीं. आबा व शंकरशास्त्री यांच्याकडून घेतल्या. तारळे गांवच्या शाळेत वामन जाऊं लागला. घरी धुळीच्या पाटीवर अक्षरओळख झाली. शाळेंत गेल्यावर स्लेट पाटी पाहिली. वामन न चुकतां संध्या व नित्यकर्मं करीत असे. त्याचा शाळेचा अभ्यासही चांगला चालला होता.

तारळ्याची शाळा चौथीपर्यंतच असल्याने पांचवीपासूनच्या शिक्षणासाठी वामनने कोल्हापूरच्या राजाराम हायस्कूलमध्ये प्रवेश घेतला. तिथे कांही दिवस त्यांच्या एका विधवा आत्येकडे ते राहिले. महालक्ष्मीच्या मंदिराजवळील नारायणस्वामींच्या मठांत वामनचे बंधू शंकरशास्त्री किंवा नरसूतात्या आळीपाळीने सेवेला रहात असत. राधानगरी पेठ्यांत (तालुक्यांत) चौथीच्या परीक्षेत वामनचा पहिला क्रमांक आला असल्याने त्याला द.म. तीन रुपयांची शिष्यवृत्ती मिळाली. नववीपर्यंत वामनने ती शिष्यवृत्ती टिकवली. सातवीनंतर ती पांच रुपये झाली. क्रमिक पुस्तकेही बह्वंशी पारितोषकांच्या स्वरूपांत मिळाल्याने वामनला शिक्षणाचा फारसा खर्च पडला नाही.

शाळेच्या वेळेशिवाय वामनने कोल्हापूरच्या वे.शा.स. आत्मारामशास्त्री पित्रे यांच्या पाठशाळेत संस्कृतचा अभ्यास केला. वामन एकपाठी असल्याने एकदां कानांवर पडले की कायमचे स्मृतीत राही. व्यायाम, पोहणे इत्यादींचेही शिक्षण वामनचे याच काळांत झाले.

चित्रकलेची आवड वामनला उपजतच होती. नववी-दहावीच्या वर्षांत (१९०६-०७) त्याचे शिक्षक त्याच्या या कलागुणाने इतके प्रभावित झाले की की त्यांनी त्याला चित्रकलेच्या पहिल्या दोन श्रेणींच्या परीक्षा द्यायला उद्युक्त केले. दोन्ही श्रंणीत उत्तम यश मिळाल्याने तृतीय श्रेणीच्या

अभ्यासासाठी मुंबईच्या जे जे स्कूल ऑफ आर्ट्स मध्ये प्रवेश मिळविला (१९०७). मात्र या स्थानांतराच्या गडबडीत वामनला मॅट्रिकच्या परीक्षेला बसतां आले नाही. उत्तम अभ्यास असूनही मॅट्रिक होण्याचा योग नव्हता. पुन्हां परीक्षा देण्याचाही त्याने प्रयत्न केला नाही.

# श्रीगुरूपसत्ती.

मुंबईला सुरुवातीला कांही दिवस वामन दादरला एका ओळखीच्या गृहस्थांकडे रहात असे आणि खाणावळीत जेवत असे. त्या वेळी ब्राह्मणाना सोंवळ्यांत जेवायला वाढणाऱ्या खाणावळी होत्या. ५-६ महिन्यांनी वामन दिवाळीच्या सुट्टीत घरी आला. वाटेत कोल्हापूरला थांबला होता. याच काळांत वाडीला प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामींचा मुक्काम नरसोबावाडीला झाला होता. ही त्यांची वाडीला संन्यासोत्तर दुसरी भेट होती. वामनरावांचे ज्येष्ठ बंधु शंकरशास्त्री वाडीतच होते. त्यांनी थोरल्या महाराजांना वामन, त्याचे शिक्षण व चित्रकला यांची माहिती दिली आणि त्याला दर्शनाला वाडीला बोलावण्यास आज्ञा मागितली. स्वामी महाराजांनी लगेच होकार दिला आणि त्याचबरोबर वामनला एक छानसे श्रीदत्ताचे चित्र काढून त्या प्रतिमेला श्लोकबद्ध हार काढायला सांगितला. तो श्लोकही त्यांनी लिहून दिला. तो असाः -

**वन्देऽहं देवदेवं धृतिमतिगतिदं साङ्गयोगप्रगम्यं।**
**पारावाराभरागाद्यरिकरिहरिमाल्हादकं दत्तदक्षम्।**
**ज्ञेयज्ञं यज्ययज्ञं सुरवरपरदं पारदं रम्यरम्यं।**
**पातारं तारतारं खलबलदलनं श्रीवरं वक्रवक्रम्।।**

**भावार्थ**:- देवाधिदेव, धैर्य, बुद्धि आणि गति यांचा दाता, अष्टांगयोगाने जाणला जाणार, सागराप्रमाणे दुस्तर अशा रागद्वेषादि षड्रिपुरूप गजांचा सिंह, आनंददायक, दानाविषयी दक्ष, ज्ञेय अशा स्वरूपाला जाणणारा, याजकांना यज्ञस्वरूप, इंद्रादि देवांना परमपद देणारा, स्वभक्तांना संसारसागराच्या पार नेणारा, अतीव सुंदर, सेवकांचा कैवारी, संन्यासांना प्रणवरूपाने उद्धरणारा, दुर्जनांचे बल खच्ची करणारा, लक्ष्मीपति आणि कुटिलांना प्रतिकूल अशा दत्तप्रभूंना मी वंदन करतो.

स्रग्धरा ह्या वृत्तांतील हा श्लोक त्रिशति गुरुकाव्याच्या तिसऱ्या शतकांत १०२रा श्लोक आहे. ह्या श्लोकांत हारबंध नांवाचा चित्रालंकार आहे. प्रत्येक चरणाचे तीन भाग केले तर प्रत्येक भागांत एका तीन वेळां येणाऱ्या विशिष्ट अक्षरांभोंवती इतर अक्षरे फुलाच्या पाकळ्यांसारखी गुंफलेली आहेत. अशा बारा फुलांचा हा हार खालील आकृतीत दाखवला आहे. श्रीस्वामी महारजांच्या स्तोत्रवाङ्मयांत असे हारबंध बरेच आहेत

सदुगुरूंच्या प्रथम दर्शनापूर्वीच ही सेवेची अपूर्व संधि वामनला मिळाली. त्यांने आपली कला व प्राण ओतून सद्गुरूंच्या आज्ञनुसार श्रीदत्तांची प्रतिमा हारासहित साकारली आणि श्रीगुरुद्वादशीच्या पर्वणीलाच ती स्वामी महाराजांसमोर ठेवून साष्टांग नमस्कार घातला! थोरल्या महाराजांना अतीव आनंद झाला. त्याची जणु पावती म्हणून त्यांनी एक यंत्र स्वहस्तें तयार करून चांदीच्या पेटीत घालून वामनला नित्य हातांत बोधायला दिले. सद्गुरूंची भेट ही शिष्याच्या आध्यात्मिक जीवनांतील एक अपूर्व घटना असते. जन्मोजन्मीच्या ऋणानुबंधाने ही होते. सद्गुरु शिष्याला परमश्वरप्राप्तीच्या सुखाच्या पाउटीवर नेतात. सद्गुरूंच्या हृदयांतील तेज शिष्याच्या हृदयांत संक्रमित होते. हा मोठा अनुपम सोहळा असतो. बाह्य उपचार तिथे वावगेच असतात. ती अनुभूती गुरु वा शिष्य कुणीच शब्दांकित करूं शकणार नाहीत. आपण या भेटीचा वामनवर झालेला परिणाम त्यांच्याच शब्दांत पाहूं या. ही घटना श्रीगुरुमहाराजांनी प.पू.बाबामहाराज मानवतकर[२] यांना सांगितली ती तशीच खाली देत आहे.

"मला लहानपणापासूनच परमार्थाची अत्यंत आवड होती. त्यांतच घरच्या चांगल्या परंपरेच्या संस्कारांची जोड मिळाली. त्यामुळे इतर अध्ययनाबरोबर आध्यात्माचा स्वाध्यायही घडत गेला आणि एक प्रकारची खंबीर बैठक तयार झाली. पूर्वार्जित कर्माचा त्यांत फार मोठा भाग होता हे केव्हांही नाकारतां येणार नाही. कारण त्यावेळीं घटनेवरून त्याचे प्रत्यंतरही मिळत गेले होते."

---

[२] 'पूजनीय श्रीगुळवणी महाराज व शक्तितपात योगदीक्षा': श्री.बाबासाहेब महाराज मानवतकर, पुणे:फंथराज:४:१:३१, चैत्र शु।।१ इ.स. १९७४.

“पुढें योगमार्गाचा अवलंब करून कांही साधना करावी अशी प्रवृत्ती निर्माण झाली. त्याच वेळी पूर्वपुण्योदयाच्या बलाने श्री.प.प.श्रीवासुदेवानंदसरस्वती स्वामीमहाराजांच्या दर्शनाचा योग घडून आला. त्यांचे दर्शन झाल्याबरोबर मला असे वाटले की हे आपले पूर्वीचेच जवळचे कुणीतरी नातलग आहेत. त्यांना मी अनन्य शरण गेलों. त्यामुळे त्यांचा परम अनुग्रह प्राप्त झाला त्या अनुग्रहाने मी पावन झालों. आपले सर्वस्व आपणांस प्राप्त झाल्याचा आनंद त्या वेळी मला झाला. सर्वस्वच प्राप्त झाले. दुसरें काय?”

“मला अनुग्रह झाल्याबरोबर एक विलक्षण अनुभव आला. नाना तऱ्हेचे नाद मला ऐकूं येऊं लागले. त्या वेळीं मला वाटले, ‘हे काय? हे नाद कशाचे ऐकूं येत आहेत? कुठे काय चालले आहे? हे नाद जवळ जवळ कसे येत आहेत? माझ्यासारखे हे नाद दुसऱ्या कुणाला ऐकू येत आहेत काय? आपण भानावर आहोंत काय?’ असे नाना तऱ्हेचे प्रश्न या नादामुळे माझ्या मनांत उत्पन्न झाले.”

“ह्या नादश्रवणाने मी प्रथम दिङ्मूढ झालो. त्यानंतर आनंदाच्या ऊर्मी उसळून आल्या आणि पुढे काय झाले? काय होत गेले? कसे सांगावे; सांगणेच शक्य नाही! कांही दिवसांनंतर मला कळून आले की हे नाद आपल्यांतच होत आहेत. ज्याला अनाहत नाद म्हणतात गे हेच आहेत. पुढे पुढे अनुभव वाढत गेले व अनुभवाचे निरनिराळे प्रकार घडून येऊं लागले. ”

## प्लेगची बाधा

वाडीहून वामनराव पुढील अभ्यासासाठी मुंबईला परत गेले. या काळांत एक विशेष घटना अशी घडली की गिरगांवात वामनराव असतांना जवळच प.पू.नारायणमहाराज केडगांवकर आले होते. वामनराव त्यांच्या दर्शनाला गेले. वामनरावांनी नमस्कार करतांच नारायणमहाराजांनी त्यांना प्रतिनमस्कार केला. ते पाहून सर्वांना आश्चर्य वाटले. संतच सांतांना ओळखूं शकतात. चित्रकलेच्या तिसऱ्या श्रेणीची परीक्षा जवळ आली होती त्याच वेळी वामनरावांना ताप येऊं लागला. परीक्षा सोडून गांवीं कुडुत्रीला येणे भाग पडले. ताप कसला तो प्लेगच निघाला. भर पावसाळ्याचे दिवस! दोनशे

इंचापर्यंत पाऊस पडायचा. तशा पावसांतही जिवाच्या भीतीने लोकांनी गांव सोडले. मात्र वामनरावांच्या वहिनी प्रसूत झाल्यामुळे गुळवणी कुटुंबाला घरी राहणे भाग पडले. वामनराव ग्लानीतच होते. त्यांना मारुतीच्या देवळांत ठेवले. दहा दिवस अन्नपाणीच काय शौचादिसुद्धां नाही. सर्वांनी त्यांची आशा जवळजवळ सोडल्यांत जमा होती. वामनरावांना मात्र श्रीस्वामीमहाराजांनी बांधलेले यंत्र आपले संरक्षण करील अशा आत्मविश्वास होता. आणि आश्चर्य असे की बारा दिवसांनी कसलेही औषधपाणी न घेतां वामनराव त्या भयानक आजारांतून उठले. आजारी असतां कसलाही नवस केला नव्हता तरीही बरे वाटूं लागतांच वामनरावांनी घरीच श्रीगुरुचरित्राचा ‘श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थ’ सप्ताह केला. आपण आपली सर्व अनुष्ठाने परमेश्वरप्रीत्यर्थच केली असे श्रीगुरुमहाराज सांगत असत. यानंतरच्या गुरुद्वादशीला वाडीला जाऊन पुनश्च सात सप्ताहांचे अनुष्ठान पूर्ण केले. पुढील सात-आठ महिने वामनरावांनी गांवीच राहून प्रकृतीच्या सुधारणेकडेच लक्ष दिले.

## पितृछत्र हरपले.

१९०९ च्या श्रावण शु।।१० ला ती.आबांचे लहानशा आजाराने वयाच्या ८०व्या वर्षी निधन झाले. या आजारांत ती.सौ.उमामातांंनी आपल्या सौभाग्यरक्षणासाठी देवाची प्रार्थना केली. दुसऱ्या दिवशी पहांटे स्वप्नांत श्रीनृसिंहसरस्वतींनी सांगितले की, “तुझ्या प्रारब्धांत २२ वर्षे वैधव्य आहे. आतां नाही भोगले तर जन्मांतरी तरी भोगावेच लागणार. तुझा काय इच्छा आहे?” उमामातांनी “मी आपल्या इच्छेबाहेर नाही,” असे सांगितले. ‘प्राप्तं प्राप्तमुपसीत’ हे भागवताचे तत्त्वज्ञान उमामातांनी आत्मसात केले होते..

## मंत्रदीक्षा.

आबांचे क्रियाकर्म आवरते तोंच श्रीस्वामी महाराजांच चातुर्मास नागपूरजवळ पवनी येथे असल्याची वार्ता ऐकून ज्येष्ठ बंधू शंकरशास्त्री तिकडे गेले. पुढे श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेने त्यांनी मातुश्री उमामाता, वामनराव व धाकटी बहीण गोदावरी यांना बोलावून घेतले. चातुर्मास समाप्ताच्या पूर्वदिवशी अनंतचतुर्दशीच्या शुभ मुहूर्तावर या तिघांनाही श्रीस्वामी महाराजांनी मंत्रदीक्षा दिली. या वेळी उमामाता आणि शंकरशास्त्री

यांनी वामनरावांच्या विवाहाचा विषय काढला. वामनरावांनी आपली इच्छा नसल्याचे सांगून पत्रिकेत आपल्याला विवाहापासून सुख नसल्याचे त्यांच्या निदर्शनास आणून दिले. त्या दोघांनी श्रीस्वामी महाराजांनही वामनच्या विवाहासंबंधी प्रश्न विचारला. "व्हायचा असेल तर होईल" एवढेच मोघम उत्तर त्यांच्याकडून मिळाले. त्यानंतर मात्र वामनरावांच्या विवाहाचा विषय कुणी काढला नाही. वामनरावांनी आपल्या जीवनाचे ध्येय निश्चित केले होते. त्यांत विवाह, प्रपंच इत्यादींना जागा नव्हती. त्यांनी मनोमन आजन्म नैष्ठिक ब्रह्मचर्याचे व्रत अंगीकारले होते. ते धन्या भुवि परमार्थनिश्चितेहाः!

# सद्गुरुतीर्थाची यात्रा.

पवनीहून कुडुत्रीला येऊन वामनराव नोकरीच्या शोधांत कोल्हापूरला गेले. तिथे एका स्नेहाच्या आग्रहाने मुंबईला जाऊनही नोकरी शोधली. वास्तविक त्या काळांत वामनरावांचे शिक्षण नोकरीसाठी पुरेसे होतेच. पण त्यांना नोकरी केवळ चरितार्थाचे साधन म्हणून हवी होती. नोकरीसाठी आपल्या नित्य-नैमित्तिक कर्मांत आणि आध्यात्मिक साधनेत कसलीही तडजोड त्यांना करायची नव्हती. पण तशी कांही नोकरी न मिळाल्याने वाडीला जसे सात सप्ताह केले तसेच गाणगापूरला पण करावेत असा संकल्प करून ते चैत्र शु।। १०, इ.स. १९१० रोजी दौंडमार्गे गाणगापूरला आले. तिथे संकल्पानुसार सहा सप्ताह ओळीने पूर्ण झाले. सातवा सप्ताह सुरू करण्यापूर्वी तिथे एक रमल ज्योतिषी आला. त्याला वामनरावांनी प्रश्न विचारला कीं, "मला पुन्हां सद्गुरूंचे दर्शन केव्हां होईल?" त्या ज्योतिषाने सांगितले की की, "झाले तर येत्या सहा महिन्यांत होईल नाहीतर कधीच नाही." सद्गुरूच वामनरावांचे सर्वस्व होते. त्यांच्या दर्शनावांचून जन्म काढण्याची कल्पनाही त्यांना सहन होईना. कधी एकदां सद्गुरुचरणांचे दर्शन घडते हीच एक तळमळ त्यांच्या मनांत सुरू झाली. आतां आधी सर्व प्रयत्नांनी सद्गुरुचरणांचे दर्शनच घ्यायचे असा त्यांनी निश्चय केला..

दुसरे दिवशी उरलेला सातवा सप्ताह एका दिवसांत पूर्ण करून जवळची छत्री उपाध्यायांना देऊन त्यांतून होईल तशी सांगता करण्यास सांगून लगेच तिसऱ्या दिवशीं पहांटेच त्यांनी गाणगापूर सोडले. श्रीमहाराज दक्षिणेकडे कुठे

तरी चातुर्मास करणार आहेत एवढ्याच मोघम माहितीवर वामनरावांनी प्रवास सुरू केला. रेल्वेच्या रुळांच्या कडेने सोलापूरच्या दिशेने निघाले. भर उन्हाळ्याचे दिवस, रुक्ष प्रदेश, पायांत कांही नाही, बरोबर दोन मोजकी वस्त्रे अशा अवस्थेत वामनराव सद्गुरूंच्या शोधांत निघाले. वाटेत दुपारच्या वेळीं एका विहिरीवर आह्निक उरकून भूक आणि तहान पाण्यानेच भागविली. ऊन उतरल्यावर परत प्रवास सुरू! कुठे तरी निवारा शोधून रात्र काढली. सकाळी आहेरवाडी नांवाच्या गांवीं एक चागली विहीर पाहून स्नानसंध्या उरकली. दोन दिवसाचे उपाशी असल्याने वामनरावांनी शेवटी एका ब्राह्मणाच्या घरी जाऊन अन्नाची याचना केली. त्याचेकडे भोजन करून परत प्रवास चालू. सहा जून, १९१०ला आरंभ केलेला प्रवास तीन ऑगस्ट १९१०पर्यंत जवळजवळ दोन महिने चालला. कधी उपास, कधी भिक्षा, कधी लग्नघरांत, कधी अन्नछत्रांत तर कधी कुणाचा पाहुणचार असे दिवस काढीत सातशे कि.मी.पायीं आणि सातशे किंमी.रेल्वेने प्रवास करीत वामनराव दुर्दम्य चिकाटीने, सर्व हालअपेष्टा सहन करीत हावनूर येथे श्रीस्वामीचरणी उपस्थित झाले. 'देहं वा पातयेत, कार्यं वा साधयेत' असा प्रखर निश्चय वामनरावांचा दिसून येतो. श्रीस्वामी महाराजांच्या मतें सद्गुरुतीर्थ हे सर्व तीर्थांत श्रेष्ठ आहे.

**तीर्थानां परमं तीर्थं तारकानां च तारकम्।**
**सद्गुर्वाख्यं महत्तीर्थं भजामि परमार्थदम्।।**

# हावनूरचा सद्गुरुसमागम.

तेव्हां वामनरावांची ही परमश्रेष्ठ अशी तीर्थयात्राच झाली. हावनूरला स्वामी महाराजांचा मुक्काम त्रिपुरांतकेश्वराच्या मंदिरांत होता. साहजिकच वामनराव तिथेच राहिले. थोरल्या महाराजांनी त्यांना सांगितले की आपण इथे चातुर्मास करीत असल्याचे पत्र कुणालाही टाकायचे नाही. पुढचे ११ दिवस वामनरावांना सद्गुरूंचा एकांत सहवास लाभला. रोज त्यांच्याबरोबर तुंगभद्रेचे स्नान करायचे, त्यांची वस्त्रे धुण्यापासून सर्व सेवा करायची, त्यांची भिक्षा झाली की त्यांचा शेष ग्रहण करून आपली माधुकरी सेवन करायची असा लाभ वामनरावांना झाला. वामनरावांच्या मनांतली इच्छा

त्यांनी न सांगतां जाणून त्यांना गीतेची व विष्णुसहस्रनामाची संथा महारजांनी दिली. रोज सकाळी स्वामी महाराज गीतेवर वामनरावांसाठी गीतेवर प्रवचन करायचे. बावनूरचे व्यंकटराव गोपाळी नांवाचे दुसरे एक श्रोते ऐकायला येत. दुपारच्या वेळी स्वामी महाराजांनी वामनरावांकडून सदाशिवब्रह्मेंद्रस्वामींची ब्रह्मसूत्रवृत्ती लिहून घेत सदाशिवब्रह्मेंद्रस्वामींच्या आठवणीही त्यांच्याकडून वामनरावांना ऐकायला मिळाल्या. याच काळांत स्वामी महाराजांनी वामनरावांना आसने आणि प्राणायाम यांचे शिक्षणही दिले. कुंडलिनीविषयींही कांही माहिती दिली. रात्रीं एक झोंप झाली की स्वामीमहाराज उठून समाधीचा अभ्यास करीत असल्याचे वामनरावांनी पाहिले.

एके दिवशीं सहज वामनरावांची पत्रिका महाराजांनी पाहिली व म्हणाले, “तुझा तर सध्यां अकरावा गुरु आहे. त्याचा तुला कांही लाभ झालेला दिसत नाही?” वामनराव लगेच उत्तरले, “आपले दर्शन व सहवास लाभला ह्यापेक्षां कोणता अधिक लाभ जगांत आहे?” स्वामी महाराजांची त्या वेळची प्रसन्नता वामनरावांना सुखावून गेली. स्वामी महाराजांनी या काळांत नित्य उपासनेविषयी खालील श्लोक सांगितला.

**स्वशाखोपनिषद्‌गीता विष्णुनामसहस्रकम्।**
**श्रीसूक्तं पौरुषं रुद्रं जपेन्मुच्येत बंधनात्।।**

आपल्या शाखेचे उपनिषत् (ऋग्वेद्यांसाठी ऐतरेय), भगवद्‌गीता, विष्णुसहस्रनाम, श्रीसूक्त, पुरुषसूक्त आणि रुद्राध्याय यांचा नित्य जप करणारा संसारबंधनांतून मुक्त होतो.

आपण भेट दिलेल्या प्रत्येक तीर्थक्षेत्राची व तेथील देवतांची स्तुति करण्याचा श्रीस्वामीमहाराजांचा प्रघात होता. हावनूरलाही त्यांनी तुंगाष्टक, चिदंबरस्तुति आणि त्रिपुरांतकेश्वर यांची स्तोत्रे केली. तुंगाष्टकांत एक हारबंधाचा श्लोक आहे. महाराजांनी वामनरावांना तुंगभद्रेचे चित्र काढून तिच्या गळ्यांत तो शब्दालंकार घालायला सांगितला व ते चित्र देवळाच्या दारावर लावायला सांगितले. तसेच त्रिपुरांतकेश्वराचे स्तोत्र मंदिराच्या चौकटीवर लिहून ठेवले.

# हे रूप नित्य हृदयीं धरी.

अशा रीतीने आनंद, समाधान आणि कृतकृत्यता यांच्या वर्षावांत अकरा दिवस कसे गेले ते कळालेच नाही. मुंबईहून मागवलेले सामन हावेरी स्टेशनला पोंचल्याचे समजले आणि वडिलांच्या पहिल्या वर्षश्राद्धाची तिथीही जवळ आली. वामनरावांना आतां हे आनंदाचे निधान सोडायचा दिवस उजाडला. सकाळी लवकरच स्नानादिक आवरून भिक्षा केली. वामनरावांचे मन सैरभैर झाले. सद्गुरूंच्या वियोगाच्या कल्पनेनेच मन भरून येऊं लागले. फार प्रयत्नांनी अश्रू आंवरावे लागत होते. स्वामी महाराजांनीही ही त्यांची अवस्था ओळखली आणि सकाळपासूनच त्याच्यावर मूक प्रेमाचा अभिषेकच सुरू केला. आज जेवायला महाराजांनी वामनरावांना आपल्या पंक्तीलाच बसविले आणि प्रसाद म्हणून आपल्या झोळीतील दोन घांस त्यांच्या पानांत टाकले. मग मात्र वामनरावांना अश्रू आंवरणे अशक्य झाले. कसेबसे जेवण उरकून वामनरावांनी सामानाची बांधाबांध केली. देवळासमोरच्या ओट्यावर महाराज सिद्धासन घालून बसले होते. वामनरावांना देण्यासाठी त्यांनी नारळ प्रसाद, आणि अंगारा आणवून ठेवला होता. सामान घेऊन वामनरावांनी बाहेर येऊन महाराजांना साष्टांग नमस्कार घातला आणि हात जोडून पुढे उभे राहिले. स्वामी महाराजांनी नारळ, प्रसाद आणि अंगारा दिला आणि सांभाळून राहायला सांगून कल्याणप्रद आशईर्वाद दिला. वामनरावांनी डबडलेल्या डोळ्यांनी ती मूर्ति डोळ्यांत सांठवली आणि विचारले, “महाराज! आतां पुन्हा दर्शन कधी होईल?” महाराजांनी आपल्या देहाकडे निर्देश केला आणि म्हणाले, “हे असेंच नित्य ध्यानांत ठेव म्हणजे झालं!”

महाराजांच्या मुखांतून हे शब्द बाहेर पडतांच स्वामीमहाराजांच्या हृदयापाशी पाय असलेली आणि स्वामीमहाराजांच्या देहांत, व्याघ्रचर्म धारण केलेल्या, स्मितमुखी पवित्रगात्र षड्भुज दत्ताचेच दर्शन वामनरावांना झाले. ते परमसुंदर रूप डोळ्यांत सांठवून त्यांनी साष्टांग नमस्कार घातला आणि उठून पाहतात तों ते रूप अंतर्धान पावून तिथे स्वामीमहाराज दिसले. म्हणाले, “आतां अधिक वेळ लावूं नकोस, लवकर नीघ!”. वामनरावांना

निरोप देण्यासाठी महाराज थोडे चालत आले, आणि माहेराहून परतणाऱ्या लेकीसारखे वळून पहात वामनराव क्लिन्न अंतःकरणाने हावेरीला आले. तेथे मुंबईवरून आलेले सामान घेऊन कुडुत्रीला गेले. आपल्या वडिलांचे वर्षश्राद्ध संपन्न झाले.

## औंढ्या नागनाथ.

आतां वामनरावांना सतत सद्गुरूंच्या सहवासांत रहावे वाटे. परंतु स्वामीमहाराजांच्या सतत परिभ्रमणामुळे त्यांच्याबरोबर फार काळ राहणे कुणालाच शक्य होत नसे. श्रीस्वामीमहाराजांचा पुढील चातुर्मास (१९११) कुरुगड्डी इथे झाला. हे आँध्र आणि कर्नाटकाच्या सीमेवरील कृष्णेच्या प्रवाहांतील एक बेट आहे. तेथील चातुर्मासानंतर श्रीस्वामीमहाराज हिंगोली येथे आले. त्यांच्या दर्शनासाठी शंकरशास्त्री पुढे गेले आणि मग त्यांनी पत्राद्वारे वामनरावांना बोलावून घेतले. वामनराव तिथे पोंचेपर्यंत महाराज पिंपरीला गेले होते. वामनरावांनी तिथे जाऊन त्यांचे दर्शन घेतले. त्या वेळी स्वामी महाराजांनी सर्व ब्राह्मणांचा सत्कार केला. वामनरावांनाही एका रेशमी उपरण्याचा प्रसाद मिळाला. पिंपरीहून महाराजांबरोबर वामनराव आणि शंकरशास्त्री औंढ्या नागनाथ ह्या ज्योतिर्लिंगाला गेले. तिथे वामनरावांनी महारजांना आसने करून दाखविली. ती त्यांना आवडली. त्यांनी सिद्धासन आणि पश्चिमोत्तानासन वाढविण्यास सांगितले. या क्षेत्रांत गुळवणी बंधूंना महाराजांच्या मुखांतून ‘ऐतरेय’ आणि ’मांडूक्य’ ही उपनिषदे ऐकायला मिळाली.

## श्रीदत्तमालामंत्राचे अनुष्ठान.

यानंररचा श्रीस्वामी महाराजांचा चातुर्मास (१९१२) नर्मदाकिनारी चिखलदा येथे झाला. हे स्थान दुर्गम असून त्या वेळी त्या परिसरांत प्लेगचाही प्रादुर्भाव होता. त्यामुळे तिथे येण्यास महाराजांची आज्ञा मिळाली नाही. त्याऐवजी श्रीक्षेत्र औदुंबर येथे जाऊन श्रीदत्तमालामंत्राचे पुरश्चरण करण्याची आज्ञा झाली. त्यानुसार वामनराव औदुंबरला गेले. तिथे रोज तीन माळा (३०० जप) याप्रमाणे ४० दिवसांत पुरश्चरण (१२०००) पूर्ण केले. या

काळांत एक विशेष घटना घडली. वामनराव कृष्णेवर स्नान करीत असतां एके दिवशी एका अनोळखी गृहस्थांनी त्यांना विचारले, “वामनराव आपणच कां?” वामनरावांनी “होय” म्हटल्यावर ते गाडगीळ नांवाचे गृहस्थांनी त्यांना आपल्याला झालेला दृष्टांत सांगितला. “एका सुवासिनीने स्वप्नांत येऊन सांगितले कीं, ‘औदुंबरला जाऊन वामनरावांना सांगा कीं त्यांचा जप ३००० कमी झाला आहे, तो पूर्ण करा!’ ” हे ऐकून वामनरावांना आश्चर्य वाटले. जप तर रोजच्या रोज ठरविल्याप्रमाणे होत असतांना कमी कसा झाला याचा ते विचार करीत असतांनाच कुडुत्रीहून पत्र आले कीं त्यांचे कौलवचे एक काका निवर्तले. परमेश्वराचे आपल्या भक्तावर कसे सतत लक्ष असते आणि त्याचा लौकिक आणि पारमार्थिकही योगक्षेम तो कसा दक्षतेने चालवीत असतो .याचे हे उत्तम उदाहरण आहे.

## गरुडेश्वरांतील सद्गुरुसेवा.

हावनूरला वामनरावांनी नेत्रांद्वारें अंतःकरणात कोरून ठेवलेली श्रीदत्तप्रभूची प्रतिमा त्यांनी चित्रबद्ध केली आणि कांही महिने कोल्हापूरात वास्तव्य केले. तिथे चित्रकलाशिक्षक म्हणून हंगामी नोकरीही मिळाली. योगाभ्यास नित्य चालूंच होता. या काळांत कांही व्यायामही सुरू केला पण तो न मानवल्याने सोडावा लागला. सद्गुरुदर्शनाची ओढ सततच होती. त्यांत स्वामी महाराजांचे आपण गरुडेश्वर इथे पोंचल्याचे व तिकडे येण्यास हरकत नसल्याचे पत्र आले. साहजिकच वामनराव १९१३च्या वैशाखांत गरुडेश्वरला सद्गुरुचरणीं उपस्थित झाले. येतांना त्यांनी प.प.श्रीनृसिंहसरस्वती (दीक्षित)स्वामींनी केलेल्या हारबंधाने सजविलेले स्वामीमहाराजांचे छायाचित्र बरोबर आणले होते ते त्यांना समर्पण केले. स्वामीमहाराजांनी ते ‘ज्याचे त्याला’ परत करायला सांगितले.



**मेशं केशं सुशंभुं भुवनवनवहं मारहं रत्नरत्नं।**
**वंदे श्रीदेवदेवं सुगुणगुरुं श्रीकरं कंजकंजं।।**
**मामज्ञं मत्तमर्भं भवदवसुवहं वासनासर्वसंधे।**
**मातः पातः सुतस्ते वह रहसि हरे देशिके शिष्यशिष्यम्।।**

पहांचे साडेचार वाजतां स्वामीमहाराज उठत. त्यांच्याबरोबर उठून शौचानंतर माती व दंतधावनासाठी आंब्याचा पाला देण्यापासून वामनरावांची सेवा सुरू होई. ते स्नानाला गेले की त्यांची ‘पर्णकुटी’ झाडून वैठकीची जागा गोमयाने सारवून ठेवीत. महाराजांची भिक्षा झाली की त्यांच्या हातावर पाणी घालायचे कामही त्यांना मिळाले. भोजनोत्तर वामकुक्षीनंतर स्वामी महाराज आलेल्या  पत्रांना उत्तरे देत. कांही निवडक पत्रांना स्वहस्ते उत्तरे लिहून मग बाकीच्या पत्रांची उत्तरे वामनरावांकडून लिहून घेत. एकदां रोजच्या सेवेच्या वेळीं नेमकी वामनरावांना झोंप लागली. त्या वेळी एक पांढऱ्या शुभ्र महाकाय नंदीने आपली शिंगे रोखून आपल्या अंगावर येत आहे, त्याच्या घुंगरांचा आवाज येतो आहे, असे स्वप्न पाहून वामनराव दचकून उठले. आपल्याला उशीर झाला या कल्पनेने खजील झालेले वामनराव लगबगीने पर्णकुटीत गेले तेव्हां स्वामी महाराज नुकतेच आपले स्मरण करीत असतांना दिसले. नंदीने सेवेची वेळ चुकूं दिली नाही याची त्यांना कृतज्ञता वाटली. स्वामीमहाराजांचा पत्रव्यवहार पुढे पुढे खूप वाढला. शेंकड्यांनी येणाऱ्या पत्रांना उत्तरे देणे अशक्यप्राय झाले. कांही काळ तर

त्यांनी वामनरावांना सांगितले की, “मालक पत्र घेत नाही असे लिही!” मग महाराजांबरोबर तिथे चातुर्मासाला आलेल्या ब्रह्मानंदस्वामींच्या विनंतीला मान देऊन पुन्हा पत्रव्यवहार यथाशक्य चालू ठेवला. महाराजांचे प्रवचन, लोकांचे प्रश्न प्रसंगोपात्त भजन, कीर्तन असे सर्व कार्यक्रम झाल्यावर रात्री झोंपायला एक वाजून जात असे. झोंपेला वेळ कुठून मिळणार? त्यामुळे वामनरावांना खांबाला टेकून उभ्यानेच झोंपण्याचा अभ्यास करावा लागला. या काळांत वामनरावांनी सद्गुरुसेवेचा मोठा आदर्शच निर्माण करून ठेवला आहे.

## वेदांतश्रवण.

महाराज सकाळी स्नानानंतर ब्रह्मसूत्रवृत्ती, मुख्य दहा उपनिषदे, कैवल्य, मौक्तिक, श्वेताश्वतर इत्यादि कांही उपनिषदे सांगत असत. हाही लाभ वामनरावांना झाला. हावनूरपासूनचा त्यांचा सद्गुरुसहवास आपण पाहिला तर त्यांचे संपूर्ण प्रस्थानत्रयीचे श्रवण श्रीगुरुमुखांतून झाले असल्याचे स्पष्ट होते. लहानपणापासूनच एकपाठी असलेल्या वामनरावांनी हे सर्व वेदांताचे ज्ञान आत्मसात केले होते यांत शंकाच नाही. परंतु आपली विद्वत्ता त्यांनी फारशी कधीही प्रकट केली नाही. प्रसंगोपात्त कुणी कांही प्रश्न विचारलाच तर मात्र त्याचे थोडक्यांत, प्रामाणिक आणि समर्पक उत्तर त्यांच्याकडून मिळायचे हे अनेकांनी अनुभवले आहे.

## श्रीदत्तप्रभूंचे चित्र.

गरुडेश्वरला वामनराव गेले त्या वेळी तिथे स्वामी महाराजांच्या जवळ दत्ताची प्रतिमा अशी कोणतीच नव्हती. त्यांना वामनरावांनी काढलेले आणि पोथीत ठेवलेले व्याघ्रचर्मधारी दत्ताचे चित्र त्यांच्याकडून मागून घेतले. त्याला एक पत्र्याची फ्रेम करून घेतली आणि तीच एका चौरंगावर मांडून तिची यथासांग पूजा करायला सुरुवात केली. नैवेद्यही त्या प्रतिमेलाच दाखवला जाऊं लागला. पुढे वामनराव जेव्हां गरुडेश्वराहून घरी निघाले तेव्हां स्वामी महाराजांनी आपल्या हाताने ती काढून त्यांना दिली.

तेव्हांपासून ते चित्र वामनरावांच्या पूजेत राहिले आणि आतां तेंच पुण्याच्या श्रीवासुदेवनिवासांतील देवघरांत आहे.

गरुडेश्वरीं वामनरावांना थंडीतापाचा त्रास सुरू झाला. तेव्हां महाराजांनी स्नान बंद ठेवून धौती व मयूरासन करायला सांगितले. साधारण महिनाभर स्नान नव्हते. दसऱ्याच्या दिवशी 'आज स्नान करतो,' असे वामनरावांनी विचारतांच महारजांनी आपल्या हातांतल्या कमंडलूंतील पाणी स्वहस्ते त्यांच्यावर प्रोक्षण करून म्हटले, "झाले ना स्नान?" स्वामी महाराजांच्या कर्मठपणाला व्यावहारिकतेची आणि भूतदयेची जोड होती हेच यांतून दिसून येते.

# श्रीथोरले महाराज ब्रह्मलीन.

आश्विन महिन्यांत वामनराव सद्गुरूंची आज्ञा घेऊन घरीं परत आले. त्यानंतर कांही महिन्यांतच आषाढ शुद्ध १ (२३जून,१९१४) रोजीं श्रीस्वामीमहाराज समाधिस्थ झाल्याचे वृत्त त्यांच्या वाचनांत आले.

# अंबरीषवरदाच्या नगरीत.

यानंतरचा ३-४ वर्षांचा काळ वामनरावांनी कोल्हापुरांत काढला. तिथे त्यांनी छायाचित्रणाचा व्यवसाय केला आणि बऱ्यापैकी पैसा आणि लौकिक मिळवला. त्यांना कोल्हापूरचे तत्कालीन राजे छत्रपति शाहू महाराज यांचाही आश्रय मिळाला. त्यांनी तेव्हां त्यांनी काढलेले लॉर्ड विलिग्टनचे छायाचित्र प्रसिद्ध झाले होते. या काळांत कोल्हापूरच्या श्रीनारायणस्वामींच्या देवळांतील पूजे-अर्चेचे काम वामनरावांकडेच होते. छायाचित्रणाच्या व्यवसांयातील प्राप्ती अनियमितच होती. त्यासाठी वामनराव नोकरी पहात होते. अखेर १९१७ साली बार्शीच्या म्युनिसिपल (क्र.१) शाळेत चित्रकलाशिक्षक जागेची जाहिरात केसरीत वाचली आणि ते बार्शीला गेले सोबत ज्येष्ठ बंधू शंकरशास्त्री आले होते. बार्शीच्या शाळेचे मुख्याध्यापक श्री.यशवंत नारायण वैद्य (वैद्यमास्तर) यांची भेट झाली. त्यांनी वरिष्ठ अधिकाऱ्यांना शिफारस करून कसलीही प्रमाणपत्रेही न पाहतां त्यांची नेमणूकही केली. वांमनरावांची राहण्याचीही व्यवस्था त्यानी आपल्याच घरी केली. वैद्यमास्तर विधुर होते.

वामनरावांच्यापेक्षा वयाने थोडे वडील होते. घरी त्यांचा ४-५ वर्षांचा मुलगा आणि त्यांची बहीण एवढीच माणसे. ते आषाढी-कार्तिकीच्या पंढरपूरच्या वाऱ्या करणारे नियमित वारकरी होते. त्यामुळे त्यांना संत दासगणूमहाराज, पू.मामा दांडेकर, पू.केशवराव देशमुख, पू. गुरुदेव रानडे अशा संतसत्पुरुषांचा सहवास लाभला होता. वामनरावांची अध्यात्मप्रवणता, अनुष्ठाशीलता, सात्त्विकता, नैष्ठिक ब्रह्मचर्य इत्यादि गुणांनी ते प्रभावित झाले. समानशीलतेने उभयतांचा परस्पर गाढ स्नेह झाला. वामनराव त्यांना वडील भावाप्रमाणे मान देत. कांही दिवस त्यांच्या घरी राहिल्यावर वामनरावांनी आपल्या मातुःश्री आणि भगिनी गोदूताई यांना आणण्याचा विचार केला. वैद्य मास्तरांनाही त्यांची अडचण पटली आणि त्यांनीच वामनरावांना एक वेगळी सोयीची खोली पाहून दिली.

बार्शीच्या शाळेत चित्रकलाशिक्षक म्हणून वामनरावांनी १० वर्षे काम केले. सवडीच्या वेळांत छायाचित्रणाचा व चित्रकलेचा व्यवसायही चालूं होता. वैद्यमास्तरांशिवाय, वे.प्रह्लादशास्त्री जोशी, मुगुटकर वकील, इत्यादि बरेच समानशील मित्र मिळाले. तसेच योगाभ्यासाची आवड असणारे बापू कुबडे, व्यंकू कुलकर्णी, भास्कर भागवत असे विद्यार्थीही त्यांच्याकडे आकृष्ट झाले. यांतील बऱ्याच मंडळींना पुढे वामनरावांकडून दीक्षा झाल्या. ह्या सर्वांचे एक अनौपचारिक अध्यात्मप्रेमी मंडळच झाले होते. ह्यां मंडळाचे विविध आध्यात्मिक ग्रंथांचे सामूहिक वाचनही चालूं असे.बार्शीला एकदां काशीचे योगानंद स्वामी आले होते. ते वामनरावांच्या योगांतील प्रगतीने प्रभावित झाले होते व त्यांनीच वामनरावांकडे योगाचे शिक्षण घेण्याचा सल्ला बार्शीकरांना दिला.

# कुंडलिनीजाग्रतीचा वेध.

वामनरावांचा योगाभ्यास चालूंच होता. प.प.श्री थोरल्या महाराजांच्या पूर्ण कृपेला ते पात्र झाले होते. त्याच्याकडून वामनरावांना मंत्रदीक्षा. योगाभ्यास, वेदांत आणि मुख्य म्हणजे ईश्वरी अनुभूती ह्या सर्वांची प्राप्ती झाली होती. आपण त्यांच्याच शब्दांत वर त्यांच्या अतींद्रिय व अनिर्वाच्या आंतरिक अनुभवांचे वर्णन वर पाहिलेच आहे. असे असूनही त्यांना आपल्यांत कांही अपूर्णता आहे अशी एक जाणीव त्यांना अस्वस्थ करीत असावी. ह्या मानसिक अस्वस्थतेचे कारण आपल्याला कळणे अशक्य आहे. प्रत्यक्ष श्रीदत्तप्रभूंचा अवतार असलेले प.प.श्रीवासुदेवानंदसरस्वतू स्वामी महारजांची पूर्ण कृपा वामनरावांनी संपादन केली होती. प.प. श्रीदीक्षितस्वामी, प.प. श्रीयोगानंद सरस्वती (प.पू.गांडाबुवा), प.पू. श्रीसीताराममहाराज टेंबे इत्यादि शिष्य श्री थोरल्या महाराजांच्या अनुग्रहाने पूर्ण झाले होते. स्वतः वामनराव ह्यांचा अधिकार किंवा प्रयत्न यां सर्वांपेक्षां कांकणभरही कमी नव्हता. तरी त्यांची साधना अपूर्ण राहिली. यावरून एकच निष्कर्ष निघतो की नियतीला त्यांच्याकडून जे कार्य करून घ्यावयाचे होते किंवा ज्या शक्तिपातसंप्रदायाच्या प्रसारासाठी त्यांचा जन्मच झाला होता त्यासाठीच त्यांच्या साधनांत ही त्रुटी ईश्वरी संकेतानुसार मुद्दामच ठेवली गेली होती. वंगदेशांत उगम पावलेली शक्तिपात संप्रदायांची गंगा दक्षिणेला येणार होती व ती शिरावर धारण करण्याचे महान कार्य वामनरावांना करावयाचे होते.

स्वतः  श्रीस्वामी महाराजांचा द्विसाहस्री हा ग्रंथ त्यांच्या नित्यपाठांत होता. त्यांतील योगरहस्यांत आणि श्रीस्वामी महाराजांच्या इतरही ग्रंथांत शक्तिचालनाचे वर्णन आहे. **चालनात्सर्वसिद्ध्याप्तिः** – कुंडलिनी शक्तीच्या चालनाने सर्व सिद्धी प्राप्त होतात व आत्मसाक्षात्काराची योग्यता येते हे त्यांच्या वाचनांत आले होते. श्रीस्वामी महाराजांच्या मुखांतूनही कुंडलिनी शक्तीविषयीं माहिती मिळाली होती. त्यामुळे कुंडलिनी शक्तीचे जागरण करून घेण्याचा त्यांना ध्यासच लागला होता. योगमार्गांत त्यासाठी त्यांचे अथक प्रयत्न चालू होते. बार्शीत असातंना त्यांना पुष्करच्या ब्रह्मानंद स्वामींचे योगरसायन हे पुस्तक वाचनांत आले. त्यांनी स्वामीजींशी

पत्रव्यवहार केला. त्यांच्या सूचनेनुसार त्यांनी पुष्करला जाऊन त्यांच्याकडे कांही काळ प्राणायामाचा रोज सहा तास प्राणायामाचा अभ्यास केला. पण अशा अभ्यासाला आवश्यक तो आहार मिळाला नाही व पुष्करचे हवापाणी मानवले नाही म्हणून तो अभ्यास त्यांना पूर्ण करतां आला नाही. ते अजमेर आणि गरुडेश्वरची यात्रा करून बार्शीला परतले.

पण त्यांच्या चित्तांतील बेचैनी थांबली नाही. खरोखर, त्यांचा एकांत सहवास त्यांनी आपले ज्येष्ठ गुरुबंधु सिप्रीचे पू.गोविंदमहाराज पंडित यांच्याशी संपर्क साधला. हे काशीचे प्रकांड पंडित श्रीराजेश्वरशास्त्री द्रविड यांचे गुरु होत. ते त्या वेळी होशंगाबाद येथे होते. त्यांच्याशी पत्रद्वारा संपर्क साधून वामनरावांनी आपली कुंडलिनीजागरणाची तीव्र इच्छा त्यांना कळविली. त्यांनी वामनरावांना मार्ददर्शन करण्याचे मान्य केले. मात्र त्यासाठी वामनरावांना होशंगाबादला जाणे आवश्यक होते.

## नर्मदातीरीं.

त्याप्रमाणे वामनरावांनी दोन-तीन महिन्यांची सवड काढली आणि १९२२च्या गणेशचतुर्थीला होशंगाबादला पोंचले. पुष्करप्रमाणे आहाराची आबाळ होऊं नये म्हणून मातुःश्रींना पण बरोबर आणले होते. तिथे खर्रा घाटावर पू.सीतारामहाराजांनी स्थापिलेल्या दत्तमंदिरांतील स्वतंत्र खोलीत राहण्याची व्यवस्था करून ठेवली होती. हिंगोलीहून वामनरावांचे गुरुबंधु श्री.शंकरराव आजेगांवकर आणि त्यांचे योगाभ्यासी मित्र श्री.बाबा महाजनही आले. बार्शीहून वैद्यमास्तरही आले. पू.गोविदमहाराजांना भेटून त्यांच्या मार्गदर्शनानुसार दुसऱे दिवशींपासूनच वामनरावांनी प्राणायामाचा तो अत्यंत खडतर असा अभ्यास सुरूं केला.

## प.प.चिन्मयानंद सरस्वती.

ह्याच काळांत होशंगाबाद येथे नर्मदेच्या उत्तरेला मंगळवार घाटावर प.प.चिन्मयानंद सरस्वती नांवाचे एक तरुण बंगाली संन्यासी आले. ढाक्याचे पुजारी चक्रवर्ती यांच्या वंशांत जन्मलेल्या पूर्वाश्रमींच्या योगेशचंद्राने वयाच्या विसाव्या वर्षींच घर सोडले आणि जगदंबामातेने दृष्टांतांत

दाखविलेल्या सद्गुरूंना – चीतलकोट येथील पू. आत्मानंद ब्रह्मचारी यांना शरण गेले. त्यांच्याकडून नैष्ठिक ब्रह्मचर्याची दीक्षा आणि शक्तिपात दीक्षा प्राप्त करून त्यांच्यासह विनोटिया येथील परमगुरु श्रीनारायणतीर्थ स्वामींच्या आश्रमांत सेवा आणि साधना करीत राहिले. दोन वर्षांनी सद्गुरु आत्मानंदांसह ढाक्याला परत जाऊन आईची अनुज्ञा घेऊन ढाक्यांतीलच मठाधीश त्रिपुरलिंग सरस्वती यांच्याकडून संन्यास घेतला. त्यानंतर चिन्मयानंद स्वामींनी हिमालयांत जाऊन एकांतात दीड वर्ष तीव्र तपश्चर्या केली. त्या वेळ त्यांना जगदंबेचा “दक्षिण चलो”. असा आदेश मिळाला. त्यानुसार यदृच्छेने हथरस स्थानकावर ते बसलेले असतां एका भक्ताने त्यांना होशंगाबादचे तिकीट काढून दिले.

पू.गोविंदमहाराजांकडे नुकतेच पदोन्नति घेऊन नागपूरहून आलेले एक न्यायाधीश श्री.सदाशिवराव परांडे रहात होते. त्यांचा साहजिकच वामनराव आणि त्यांचे सोबती यांच्याशी परिचय. झाला व त्यांच्या परमार्थप्रवण स्वभावामुळे तो वाढला. न्या.परांडे यांचा कुलार्णवतंत्राचा अभ्यास होता. त्यांनी कुंडलिनीच्या जाग्रतीसाठी चाललेला वामनरावांचा खडतर अभ्यास पाहिला. त्यांनी तंत्रग्रंथांच्या आधाराने शक्तिचालनाचा आणखी एक सुलभ उपाय असल्याचे वामनरावांना सांगितले. तो म्हणजे वेधदीक्षा. ह्यां दीक्षेत अधिकारी गुरू आपल्या संकल्पाने शिष्यांतील सुप्त शक्ति जागृत करूं शकतो. पण असा अधिकारी गुरू कुठे भेटणार? नर्मदाकांठावर सतत जटी-तपी-साधूंचा वावर असतो. तेव्हां इथे कुणी असा योगी भेटूं शकेल अशा अपेक्षेने त्यांनी आपल्या मित्रांसह शोध आरंभिला. त्यांचे नारायणप्रसाद नांवाचे एक मित्र एकदां एका तरुण बंगाली संन्याशांना भिक्षेला घरीं घेऊन आले. भोजनाच्या वेळीं त्या यतींजवळ वकीलसाहेबांनी वेधदीक्षेसंबंधी चौकशी केली व ‘अशा प्रकारे कुंडलिनी जागृत करणारे कुणी योगी आपल्या पाहण्यांत आहेत का’ अशी पृच्छा केली. ते संन्यासी म्हणाले, “मी स्वतःच शक्तिपातदीक्षा देतो!” ते संन्याशी अर्थातच स्वामी चिन्मयानंदच होते. वकीलसाहेबांनी ही हकीकत न्यायमूर्तींना सांगितली. त्यांनी ह्या दीक्षेचा पडताळा पाहण्यासाठी नारायणप्रसादांनाच दीक्षा घ्यायला

तयार केले. स्वामींनीही ईश्वरी संकेत समजून त्यांना दीक्षा दिली. नारायणप्रसादांची साधना सुरू झाली व त्यांना उत्तम अनुभवही येऊं लागले.

न्यायमूर्तींनी हा घटनाक्रम वामनराव आणि त्यांच्या मित्रांना कळविला. सर्वांनाच जिज्ञासा वाटली आणि ते चिन्मयानंदस्वामींच्या दर्शनाला गेले. स्वामी तिशीतले असले तरी वंगदेशीय मार्दवाने दिसत विशीतलेच. अगदी पोरगेले वाटत. इतक्या लहान वयांत एवढा मोठा अधिकार आहे यावर विश्वास बसणेही कठिण. पण तिथे साधनाभ्यासाला आलेल्या साधकांचे साधन सर्वांनी पाहिले आणि थक्क झाले. योगाभ्यासी साधकांना दीर्घकालीन प्रयत्नानेही दुःसाध्य असलेली योगासने, क्रिया, प्राणायाम इत्यादि दीक्षित साधक सहज करतात – नव्हे त्यांच्याकडून सहज घडतात हे प्रत्यक्ष पाहिल्यावर सर्वांच्याच मनांतील शंकांचे आपोआपच निरसन झाले. स्वामीमहाराजांविषयी आदर वाटूं लागला. त्यांचे वैराग्य, साधेपणा आणि निरंतर ध्यानमग्न वृत्ती यांनी वामनरावादि मंडळी फारच प्रभावित झाली. "दर्शने प्रशस्ती पुण्यपुरुष" . या ज्ञानेश्वरींच्या उक्तीचा अनुभव आला. हे साधकमंडळ मग रोजच नर्मदा पार करून मंगळवार घाटावर जाऊं लागले. स्वामीमहाराजांनाही त्यांच्याविषयी आत्मीयता वाटूं लागली. सदाचार, तीव्र मुमुक्षा आणि प्रखर धर्मनिष्ठा वामनरावांच्या आणि त्यांच्या सोबत्यांच्या वागण्यातून प्रकटत होती. त्यांच्याबरोबर चर्चा करण्यात, त्यांच्या प्रश्नांची उत्तरे देण्यांत, त्यांच्याबरोबर फिरायला जाण्यात स्वामीमहाराजांना आनंद वाचूं लागला.

याप्रमाणे दोन-तीन आठवडे गेले. शंकररावांच्याबरोबर आलेले बाबा महाजन यांचा योगाचा चांगला अभ्यास होता. त्यांना गांवी परतणे आवश्यक झाले. जाण्यापूर्वी त्यांनी स्वामिश्रींना दीक्षेबद्दल प्रार्थना केली. "पुढे पाहूं" असे उत्तर आल्याने ते थोडे निराश झाले. दुसरे दिवशी गांवाकडे निघतांना ते स्वामींचे दर्शन घ्यावे म्हणून ते मंगळवार घाटावर आले. त्याच वेळी स्वामींनी त्यांना आसनावर बसायला सांगितले आणि दीक्षा दिली. लगेच त्यांच्या तीव्र क्रिया सुरू झाल्या. त्यांचे भरदार शरीर घामाने भिजून गेले. आंतून एक प्रकारचा आनंद आणि उत्साह वाटूं लागला. शरीर हलके

झाल्यासारखे वाटले. तासाभराने कसे तरी उठून त्या भारावलेल्या अवस्थेतच ते खर्रा घाटावर आले. त्यांनी आपली दीक्षा झाल्याचे वामनरावांना सांगितले. त्यांनी त्यांच्या अनुभवांविषयी विचारतांच ते म्हणाले, “तुम्हीच पहा!” असे म्हणून त्यांनी लगेच तिथेच बैठक घातली. त्या वेळच्या बाबांच्या क्रिया पाहिल्यावर वामनरावांची वेधदीक्षेने होणाऱ्या कुंडलिनी जागरणाबद्दल पूर्ण खात्री पटली. त्यांच्या मनांत स्वामीमहाराजांविषयी नितांत आदर उपजला.

## वामनरावांच्या घरी स्वामीमहाराज.

याच काळांत स्वामींची शरीरप्रकृती बिघडली होती. पूर्णानंद नांवाच्या एका आर्यसमाजी साधकांना दीक्षा देतांच त्याना जोराची उलटी झाली. पूर्णानंदांना पूर्वाश्रमी विषप्रयोग झाला होता त्याचा हा परिणाम हे स्वामींच्या ध्यानांत आले. पूर्णानंदाला विचारतांच त्याने ते कबूल केले. धर्मशाळेत राहून आणि मिळेल ती भिक्षा घेऊन प्रकृतीतला बिघाड कसा दूर होणार? पण संन्यासधर्माल अनुसरून ते सर्व सोसणे भाग होते. वामनरावांच्या हे लक्षांत आले. त्यांनी आपल्या आईच्या आज्ञेने स्वामींना कांही दिवस आपल्या खोलीवरच रहायला आणण्याचा विचार केला. त्यांनी त्याप्रमाणें विनंति केली कीं, “स्वामीमहाराज! आमच्या आईची अशी इच्छा आहे की कांही दिवस आपण आमच्याकडे रहायला यावे.” लगेच स्वामीमहाराज उत्तरले, “आमच्याही आईची तशीच इच्छा आहे.” स्वामिश्रींची प्रत्येक कृति ही जगदंबेच्या इच्छेने होत असे. तसे एकदा पुढे एकदां म्हणालेही, “ती मला एके ठिकाणी राहूं देत नाही.” आज्ञा पाळण्यांत थोडीही कसर झाली तर लगेच शिक्षा होत असे. श्रीथोरल्या महाराजांचे जे श्रीदत्तप्रभूशी नाते होते तसेच श्रीचिन्मयानंदांचे कालीमोतेशी होते.

## वामनरावांचा निश्चय.

स्वामींना वामनरावांच्या घरी विश्रांति आणि घरचा नियमित आहार मिळूं लागले व त्यांची प्रकृतीही सुधारूं लागली. त्यांच्या अनुग्रहीत साधकांचे येणेजाणे इथेही सुरूं झाले. त्यांनी वामनरावांचा नित्याचा कार्यक्रम पाहिला. विशेषतः ते शक्तिचालनासाठी करीत असलेला प्राणायामाचा अभ्यासही

पाहण्यांत आला. वामनरावांनाही आतां ही शक्तिपात योगाची दीक्षा आपण घ्यावी असे वाटूं लागले. पण त्यांच्या मनांत एक किंतु येत होता. "आपण एका महान व श्रेष्ठ सत्पुरुषाचे अनुग्रहीत असून त्यांचे एकनिष्ठ शिष्य आहोंत. आपण पुन्हां लोकनाथतीर्थस्वामींना शरण जाण्यांत निष्ठ-व्यभिचार तर होत नाही ना? मी ज्यांचा प्रथम अनुग्रह घेतला ते फार थोर महात्मा होते. त्यामुळे अशी शंका आली. शिवाय त्यांच्या अनुग्रहामुळे मला ज्वलंत अनुभवही आला होता. त्यामुळे माझ्या मनांत ही शंका आली. अशावेळी शक्तिपात योगदीक्षानुग्रहाचा विचार मी कां करावा? हा माझ्यापुढे प्रश्नच पडला. या प्रश्नामुळे माझ्या मनांत खूप आंदोलन झाले व विलक्षण खळबळ माजली. शेंवटी एक दिवस मी श्रीगुरुदेवांचा प्रार्थना करून निद्राधीन झालो."
"उत्तररात्रीचा समय असेल. प्रखर प्रकाशांत श्रीगुरुदेव महाराजांचे दर्शन झाले. ते बोलूं लागले, 'अरे! शक्तिपात दीक्षा घेण्यास कांहीही हरकत नाही.' त्यानंतर जाग आली. स्वप्नसाक्षात्कार होऊन दीक्षा घेण्याची प्रत्यक्ष आज्ञाच झाली होती. त्यामुळे मनाला खूपच समाधान वाटले. श्रीस्वामी महाराजांची ही आज्ञा प्रमाण मानून मी दीक्षा घेण्याचे ठरविले. माझ्या मनांतील शंकेचे पूर्ण निरसन झाले होते. त्यानंतर माझ्या मनांत असाही विचार आला की **यांतून कांही चांगले घडून येऊं शकेल! त्याकरितांही हा योग घडून आला असेल.** "[3]

## वामनरावांना शक्तिपात दीक्षा.

वामनरावांची बुद्धि अशा प्रकारे निश्चयात्मक झाली आणि त्यांनी निःशंक मनाने श्रीचिन्मयानंदस्वामींकडे दीक्षेसाठी प्रार्थना केली. त्या वेळी श्रीस्वामीमहाराजांना प्राणायामाचा अभ्यास चालूं असतां दीक्षा देणें प्रशस्त वाटले नाही. त्यांनी "पुढे पाहूं" असे उत्तर दिले. त्याच वेळी, "वेळ आल्यावर दीक्षा होईलच," असे आश्वासनही दिले. परंतु वामनरावांना फार वाट पहावी लागली नाही. ४-५ दिवसांनीच त्यांना आपल्याला चिन्मयानंद

[3] 'पूजनीय श्रीगुळवणी महाराज व शक्तितपात योगदीक्षा': श्री.बाबासाहेब महाराज मानवतकर, पुणे:फंथराज:४:१:३१, चैत्र शु।।१ इ.स. १९७४.

स्वामींचा अनुग्रह होऊन क्रिया होत असल्याचे स्वपन् पहांटेच्या वेळी पडले. त्याच दिवशीं संध्याकाळी स्वामीश्रींनी त्यांना बसायला सांगितले आणि मस्तकाला स्पर्श करून दीक्षा दिली. पाठीच्या कण्यावरून हात फिरवून भ्रूमध्याला अंगठा टेकून सहस्रार चक्रावर हात ठेवला. प्राणायामाने हलके झालेले वामनरावांचे शरीर पद्मासनावरच दीड-दीड फूट उंच उडूं लागले. (दार्दुरी गति). तीव्र वेगाने भस्त्रिका होऊं लागली. अंग घामाने भिजून चिंब झाले. मनांत आनंद उचंबळत होता. साधारण तासाभराने वामनरावांनी डोळे उघडले तेव्हां स्वामीमहाराज विचारी होते, “काय वामन! झाली कां कुंडलिनी जागृत? धन्य हो! बहुत अच्छा साधन हुआ!” वामनरावांनी उठून स्वामींना साष्टांग नमस्कार केला आणि स्वामींच्या चरणी माथा ठेवून बराच वेळ आपली कृतज्ञता मूकपणेच व्यक्त केली. स्वामींनी आपला वात्सल्याने भरलेला हात त्यांच्या अंगावर, डोक्यावर फिरवला आणि म्हणाले, “तुम्हारा कल्याण हो गया!” प.प.श्री थोरले महाराजही हावनूरच्या दर्शनानंतर म्हणाले होते, “कल्याण आहे.”

अशा रीतीने ज्या हेतूने वामनराव होशंगाबादला आले होते तो हेतू अकल्पित रीत्या सिद्ध झाला. ८-१० दिवस स्वामींच्या समोर साधना झाली. यंदाची गुरुद्वादशी आणि दिवाळीसुद्धा वामनरावांनी स्वामीमहाराजांच्या सान्निध्यांतच साजरी केली. वामनरावांचा गुरुद्वादशीची वाडीची वारी चुकल्याची ही त्यांच्या जीवनांतील एकमेव वेळ आहे. त्यानंतर ही सगळी मंडळी औरंगाबाद, वेरूळ, अजिंठा इत्यादि यात्रा करू हिंगोलीस शंकरराव आजेगांवकर यांच्या घरी गेली. तिथे दोन आठवडे मुक्काम करून वामनराव मातुःश्रींसह बार्शीला परतले आणि श्रीस्वामी महाराज अमरावतीला न्या.परांडे यांच्याकडे गेले. तिथून परत होशंगाबादला येऊन एक वर्ष तिथेच राहिले.

## वामनरावांना दीक्षागुरुत्व!

बार्शीला वामनरावांची नोकरी व व्यवसाय चालू होता. नवीन साधना उत्साहाने आणि जोनामे चालू होती. स्वामीमहागाजांशी पत्रव्यवहार चालू होता. वामनरावांची इच्छा स्वामी महाराजांनी कांही काळ बार्शीत येऊन रहावे अशी होती. बार्शीच्या त्यांच्या मित्रमंडळालाही स्वामी महारजंच्या दर्शनाची

उत्सुकता होतीच. सर्वांच्या आग्रहाला मान देऊन १९२४च्या जानेवारी महिन्यांत स्वामी महाराज बार्शीला आले. दोन-अडीच महिने वास्तव्य झाले. वामनरावांनी अत्यंत दक्षतेने त्यांची बडदास्त ठेवून निरलस सेवा केली. स्वामींना हवा असलेला 'जीवनमुक्तिविवेक' हा ग्रंथ सटीक उपलब्ध करून स्वहस्ते लिहून त्यांना अर्पण केला. त्यांच्याकडून तो समजूनही घेतला. वैद्यमास्तर आणि प्रह्लादशास्त्रीही त्यांत सामील झाले. याच मुक्कामांत वामनरावांच्या भगुनी श्री.गोदूताईंना तसेच मुगुटकर वकील आणि नारायणराव पुरंदरे यांना स्वामींनी दीक्षा दिल्या. याच वेळी बापू कुबडे यांनीही दीक्षेची प्रार्थना केली; त्या वेळी स्वामी महाराजांनी वामनरावांना "तुम इन को देख लेना," असा संकेत दिला होता. स्वामींच्या इच्छेनुसार त्यांच्यासह पुन्हा एकदा पंढरपूरची यात्रा केली. बार्शीहून स्वामी उज्जयिनीला गेले.

बार्शीच्या वामनरावांच्या मित्रमंडळांत वे.प्रह्लादशास्त्री जोशी यांचे स्थान अग्रगण्य आहे. हे व्युत्पन्न वैदिक ब्राह्मण असून बार्शीच्या उच्च माध्यमिक शाळेत व संस्कृत पाठशाळेत लोकप्रिय व सन्मानित अध्यापक होते. त्यांच्या पत्नी सौ.गोपिकाबाई यांना शक्तिपात दीक्षा घेण्याची फार तळमळ लागली. त्यांच्या वतीने वामनरावांनी उज्जयिनीला स्वामीमहाराजांना पत्राद्वारे त्यांची इच्छा कळविली. उत्तरी स्वामीमहाराजांनी वामनरावांनाच चांगला दिवस पाहून व शास्त्रीबुवांची आज्ञा घेऊन त्यांना दीक्षा द्यावी असा आदेश पत्राद्वारे दिला. त्यानुसार १९२४ सालच्या अनंतचतुर्दशीला वामनरावांनी शास्त्रीबुवांच्या अनुमतीने आणि साक्षीने सौ.गोपिकाबाईंना डोक्यावर हात ठेवून दीक्षा दिली. त्यांना तासभर तीव्र क्रियां होऊन त्या प्रगाढ ध्यानांत मग्न झाल्या. त्यानंतर भावपूर्ण अंतःकरणाने त्यांनी वामनरावांना नमस्कार केला व दोन रुपयांची दक्षिणा पुढे ठेवली. "स्वामींची कृपा झाली. छान झाले" असे म्हणून वामनरावांनी दक्षिणेचे पैसे स्वामीमहाराजांकडे पाठविले. यावरून ही दीक्षा स्वामीमहाराजांची आहे, आपण केवळ माध्यम आहोंत अशी त्यांची निरहंकाराची वृत्ती स्पष्ट होते.

आतां वामनराव किंवा गुळवणी मास्तर हे नांव न लिहितां आपण त्यांचा निर्देश 'गुळवणीमहाराज', 'गुरुमहाराज' किंवा 'महाराज' असाच करूं या. या ठिकाणी श्रीगुरुमहाराजांच्या जीवनाचा पूर्वार्ध पूर्ण झाला. ते साधकाचे सिद्ध झाले. 'आतां उरलो उपकारापुरता' या भूमिकेला ते पोंहोंचले. त्यांच्या पुढील पन्नास वर्षांच्या जीवनांत त्यांनी जो लोकसंग्रह केला त्याचे संक्षिप्त अवलोकन यथाशक्ति उत्तरार्धांत करूं या.

श्रीगुरुचरणारविंदयोरर्पणमस्तु।

श्रीगुरुदेव दत्त।

# पुण्यनगरीत आगमन.

पूर्वार्धांत आपण श्रीगुरुमहाराजांना दीक्षागुरुत्व प्राप्त झाल्याचे पाहिले. श्रीचिन्मयानंद स्वामीमहाराजांच्या आज्ञेने. एका सुवासिनीला – सौ.गोपिकाबाईना, पहिली दीक्षा झाली. नंतरच्या तीन दीक्षा श्रीगुरुमहाराजांच्या विद्यार्थ्यांना झाल्या. श्रीस्वामींचा तसा आदेशच झाला होता. त्यांती औँढी गांवचे व्यंकू कुलकर्णी, सोलापूरचे बापूसाहेब कुबडे आणि दौंडचे भास्कर भागवत यांना त्यांच्या त्यांच्या गांवीं जाऊन दिल्या. त्यापूर्वी **श्रीस्वामी महाराजांनी १९२५चा चातुर्मास** बार्शीत केला. पुढे लवकरच बार्शीच्या शाळेतील बदलत्या व्यवस्थेमुळे वैद्य मास्तरांनी राजीनामा दिला. वैद्यमास्तर गेल्यावर श्रीगुरुमहाराजांनाही तिथे काम करणे कठिण होऊं लागले. प्रथम त्यांनी कांही दिवस दीर्घ मुदतीची रजा घेतली व वैद्यमास्तरांना घेऊन आपल्या गांवी कुडुत्रीला गेले. तिथे जमीन, घर इत्यादि स्थावर मालमत्तेच्या वाटण्या झाल्या महाराजांनी आपल्या सर्व बंधूंना आपल्याला वडिलोपार्जित मिळकतीतून कशाचीही अपेक्षा नसल्याचे सांगितले व सर्व मालमत्ता भावांमध्ये वाटण्यात आली. त्याचप्रमाणे उमामातुःश्रींची सर्व जबाबदारी आजीवन स्वतःहून स्वीकारली.

त्यानंतर वैद्य मास्तरांसह ते हैद्राबादला गेले आणि तेथील महान सत्पुरुष भटजीबापूमहाराज यांचे दर्शन घेऊन कुरुगड्डीला गेले. ह्याआधी ते बार्शीहून एकदां तिथे आले होते. या खेपेस त्यांनी वाडी व गाणगापूरला केली

तशी, समश्लोकी गुरुचरित्राची, तीन दिवसांची सात पारायणे केली. नित्य साधनेसाठी ते श्रीथोरल्या महाराजांच्या गुहेत बसत असत. तिथून महाराज बार्शीला गेले व रीतसर नोकरीचा राजीनामा दिला. तोंपर्यंत वैद्य मास्तर पुण्यांत आले होते. त्यांचे वारीतील स्नेही श्री.नटेश अय्यर, सुपरिंटेडिंग एंजिनीअर यांच्या ओळखीने नू.म.विद्यालय पुणे येथे महाराजांसाठी चित्रकलाशिक्षकाची नेमणूक निश्चित केली होती. अशा रीतीने बार्शीचे अन्नोदक संपले आणि महाराज पुण्यात आले. श्रीमहाराजांचे अवतारकार्य पुण्यांतूनच घडावे असाच ईश्वरी संकेत यांतून स्पष्ट होतो. पुढे झालेल्या घटनांतून हाच दृढावतो. वैद्य मास्तरांच्या प्रयत्नाचे निमित्त करून वामनराव लवकरच २०, नारायण पेठ येथील गोवईकरांच्या चाळींत स्थिरावले. वैद्यमास्तरांची अशी फार काकुळती होती की गुरुमहाराजांच्या सेवेला कुणी तरी सात्त्विक तरुण त्यांच्या निकट असावा. यदृच्छेने तीही काळजी मिटली. त्यांच्याच नात्यांतील डोणजे गांवाचे सालस, सज्जन आणि धार्मिक वृत्तीचे भुजंगराव भालेराव ह्यांना पुण्यातील न्यायालयांत नोकरी मिळाल्याचे त्यांना कळतांच त्यानी भुजंगरावांना महाराजांच्या शेजारच्याच जागेत घर करण्याची सूचना केली. ती त्यांना आवडून त्याप्रमाणे महाराजांना आपुलकीचा शेजार तर मिळालाच, पण थोड्याच दिवसांत भुजंगरावांच्या पत्नी सौ.गोदावरी यांनी महाराजांची दीक्षाही घेतली. भालेराव दांपत्याने व पुढे त्यांच्या पुत्रांनीही आजीवन श्रीगुरुमहाराजांची आत्मीयतेने आणि निरलसतेने सेवा केली. ते महाराजांचे “कुटुंबीयच” झाले. गोवईकर चाळीचे मालक श्री.दादासाहेब आणि त्यांच्या कुटुंबाने महाराजांना आदराची वागणूक दिली. त्यांच्या सोवळ्या-ओवळ्याची सोय व्हावी म्हणून त्यांना त्यांच्यास्वतंत्र नळ करून दिला. महाराजांनी मातुःश्री उमाबाई आणि भगिनी गोदूताई यांना आणले आणि तिथे राहून आपला चित्रकलाशिक्षकाचा कार्यभार सांभाळीत आपली साधना आणि उपासना दृढपणे चालविली.

पुण्यांतील सर्वसामान्य चाळीसारखीच ही चाळ होती. पण श्रीगुरुमहाराजांच्या वास्तव्याने तिला एखाद्या आश्रमाचे स्वरूप प्राप्त झाले. पानशेताच्या प्रलयानंतर १९६४ साली श्रीवासुदेव-निवासांत स्थानांतरित

होईपर्यंत महाराजांनी इथे वास्तव्य केले. दोन खोल्यांच्या जागेतच त्यांची तपश्चर्या झाली. सद्गुरूंचे जयंती आणि पुण्यतिथीचे उत्सव साजरे झाले. किती तरी महान साधुसंत, थोर विभूती, अधिकारी पुरुष इथे आदराने आले. अगणित मुमुक्षूंना इथे साधना मिळाली. कित्येक आर्त आणि अर्थार्थी आपले इप्सित पावले. कित्येक अश्रद्ध श्रद्धावंत झाले. हा सर्व श्रीगुरुमहाराजांच्या शांत, दांत, तपःपूत, सहज, निरभिमान कर्तृत्वाचा आविष्कार होता.

## श्रीगुरुमहाराजांची चित्रकला

महाराजांचे कार्य आरंभी कसलाही गाजावाजा न करतां चालले होते. शाळेत एक सज्जन व सक्षम चित्रकलाशिक्षक एवढीच ओळख सर्वांना होती. इथेही उत्सवांत गणेशाच्या मूर्ति इत्यादि कलाकुसरीची कामे ते करीत. उत्तम रांगोळ्याही काढीत. वर्गांत शिकवतांना एकाच दोन्ही हांतानी दोन चित्रे काढण्याचे त्यांचे सव्यसाचित्व विद्यार्थ्यांना मोहून टाकीत असे. एकदां शोळेचे मुख्याध्यापक म.म.दत्तो वामन पोतदार यांनी त्यांनी क्रेप फुलांवर एक इंग्रजी पुस्तक वाचायला दिले. ते वाचून महाराजांनी केलेली विविध फुले शाळेच्या वार्षिक स्नेहसंमेलनानिमित्त भरविलेल्या प्रदर्शनांत खूपच गाजली. त्या फुलांना भुलून भुंगेही गोळा झाले असे म्हणतात. क्रेप पेपर करणाऱ्या युरोपीय कंपनीचे तज्ज्ञ आणि इतरही युरोपीय लोक महाराजांच्या ह्या कलाकुसरीने प्रभावित झाले. अनेकांनी महाराजांनी केलेल्या फुलांचे गुच्छ विकत घेऊन घरी ठेवले. त्यांची कलाकृती पुण्यांत व पुण्याच्या बाहेरही विविध प्रदर्शनांत मांडली जाऊन त्यांना विविध पारितोषकेही मिळाली. महाराजांच्या क्रेप कागदाच्या कलाकृति ‘डेनिसन’ कंपनीच्या प्रतिनिधीमार्फत अमेरिकेत बोस्टनच्या प्रदर्शनांतही दाखविल्या गेल्या व नांवाजल्या गेल्या. तत्कालीन आंग्ल शिक्षणाधिकारी व त्यांची पत्नी इतके प्रभावित झाले की त्यांनी महाराजांकडून ही कला शिकण्याचा आग्रह धरला. प्रयत्न करूनही हा आग्रह टाळतां न आल्याने महाराजांनी त्या बाईंना कांही दिवस कँपांत जाऊन ही कला शिकवली. ही अवाञ्छित प्रसिद्धी झाल्यानंतर मात्र महाराजांनी आपले कलागुण फारसे प्रकट होऊं नयेत अशी दक्षता घेतलेली दिसते. महाराजांनी श्रीस्वामीमहाराजांची सात तैलचित्रे काढली.

फारच आग्रह झाल्याने त्यांनी कांही वैयक्तिक तैलचित्रेही काढली. अत्रिवरद इत्यादि दत्तात्रेयांच्या सोळा अवातारापैकी सहा-सात अवतारांची चित्रे त्यांनी काढल्याचा उल्लेख आहे. अत्रिवरदाचे एक चित्र त्यांनी प.प.श्री नृसिंहसरस्वती (दीक्षित) स्वामी महाराजांसाठी काढले होते. हे श्रीवासुदेवनिवासांत लावलेले आहे. त्यावरून केलेली मूर्ति अमरापूरच्या श्रीवासुदेवपीठांत पाहतां येते. गणपतीच्या मूर्ति अतिशय कल्पक, सुबक आणि चित्ताकर्षक असत. त्यांनी केलेला “शिंदेशाही” पगडीचा गणपति खूप गाजला. यांतील कांही चित्रांच्या प्रतिकृति श्रीक्षेत्र गाणगापूरच्या “श्रीगुळवणीमहाराज धर्मशाळेत” प्रदर्शित केलेल्या आहेत. महारजांचा पौर्वात्य तसेच पाश्चात्य चित्रकलेचा अभ्यास प्रगाढ होता. प्रसंगाने त्या क्षेत्रांतील तज्ज्ञांसमोर तो प्रकट होत असे.

## प्रपंच करावा नेटका.

महाराजांचा पुण्यातील दोन खोल्यांचा प्रपंच हा ब्रह्मचाऱ्याचा संसार होता. आई आणि बहीण यांच्यासह, शिक्षकाच्या मित उत्पनात सर्व गाडा चालवायचा. म्हणजे साधेपणा आलाच. पण त्या साधेपणांतही नेटकेपणा होता. सर्व कार्यक्रम नियमित आणि आखीव असत. तिघेही कुटुंबीय परमार्थसाधक आणि तपःसक्त असल्याने सुसंवाद सहजच होई. थोडकेच कपडे पण दर्जेदार, स्वच्छ व नीटनेटके होते. चित्रकाराच्या सौंदर्यदृष्टीचा प्रभाव त्यांच्या रेखीव फेट्यापासून उलनच्या कोटापर्यंत जाणवत असे. पहांटे साडेचारला उठून शौचमुखमार्जन व श्रीथोरल्या महाराजांच्या सूचनेनुसार अजपा जपाचा संकल्प करून व आईला नमस्कार करून महाराज साधनेला बसत. महाराजांची साधना पहांटे तीन तास तरी चालत असे. त्यांच्या साधनेत भ्रामरीचा नाद जोरांत होत असे. तो बाहेर जाऊं नये म्हणून अभ्यासाच्या खोलीला आंतून लिंपून ती जवळजवळ साउंडप्रुफ केली होती. आपले साधन गुप्त रहावे यासाठी हा खटाटोप होता. ह्या काळांत त्यांचा खेचरीचाही अभ्यास चालू होता.



साधनेनंतर वृत्तपत्र (सकाळ) वाचन व दिवस पाहून न्हाव्याकडून श्मश्रू करविल्यावर स्नान होई. त्यांत गायत्रीचा रोज बाराशे जप असे. प.प.श्रीटेंबे स्वामीमहाराजांकडून मिळालेल्या श्रीमद्भगवद्गीता व विष्णुसहस्रनाम ह्यांचे पठण होत असे. तसेच स्वहस्ते लिहिलेल्या ऐतरेय उपनिषदाचा व द्विसाहस्री गुरुचरित्राचेही पठण करीत द्विसाहस्री नित्य सप्ताहपद्धतीने वाचीत. मातुःश्रींना मिळालेल्या प्रासादिक पादुकांचे अर्चन रोज रुद्र, पुरुषसूक्त व शक्यतों पवमान यांच्या अभिषेकाने होत असे.

साडेदहाची शाळेची वेळ होती. त्याआधी भोजन तयार असेय भोजन होई. आहार "रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या" असा सात्त्विकप्रिय होता. हित, मित आणि मेध्य होता. आयुष्यभर कटाक्षाने सोंवळ्यात केलेला स्वयंपाक सोंवळ्यानेच सेवन केला. आईच्या आज्ञा म्हणून थोडी वामकुक्षी

करून शाळेला जात. संध्याकाळी शाळेतून आल्यावर तासभर फिरायला जाऊन सातसाडेसातला घरी येत. नंतर शौचादि उरकून सायंसंध्या, आरती, स्तोत्रपाठ इत्यादी करीत. त्या वेळीही तासभर साधनेची बैठक होत असे. संध्याकाळी जेवण नसे. सगळेच फराळ करीत. मग रात्री झोंपण्यापूर्वी आईचे अंथरूण घालून देऊन तिचे हातपाय चेपणे इत्यादि सेवा करून त्यांच्या पायांवर मस्तक ठेवून नमस्कार करीत. अशी ही त्याची थोडक्यांत दिनचर्या होती. गांवाला गेल्यावर किंवा विशेष प्रसंगी तीत फरक पडे तेवढाच.

शाळेत, 'गुळवणी सर हे एक साध्या राहणीचे, नियमित, संयमी, मितभाषी, मृदु वाणीचे शिक्षक आहेत, विद्यार्थ्यांत प्रिय आहेत,' यापलीकडे फारशी माहिती कुणाला नव्हती. त्यांच्या योगांतील अधिकाराची, धार्मिक श्रेष्ठतेची, एवढेच काय त्यांच्या नैष्ठिक ब्रह्मचर्याचीसुद्धा माहिती त्यांच्या सहकाऱ्यांन वा विद्यार्थ्यांना नव्हती. ते सर्वांशी मनमिळाऊपणे वागत. प्रसंगी लोकांना मदत करीत. तरीही अलिप्त रहात. **'एकचार्यप्रमत्तोल्पवाग्गुहास्थोऽगृहो मुनिः एकोऽहिवद्गत्यलक्ष्यो**' (अहिवत् एकचारी, अप्रमत्त, अल्पवाक्, गुहास्थो अगृहो मुनिः) या द्विसाहस्रीतील (४:३०) सर्प या गुरूच्या शिकवणीप्रमाणे ते लोकांत फार न मिसळणारे, संयमी, मितभाषी, एकांतप्रिय आणि आपली ओळख प्रच्छन्न ठेवणारे होते.

सामाजिक समारंभांत फारसा पुढाकार न घेतला तरी शाळेतील व शहरांतील कांही विशेष समारंभांना ते आवर्जून जात. पुण्यांतील वसंतव्याख्यानमाला, कांही पं.बाळशास्त्री हरदास वगैरे विद्वानांची व्याख्याने ते सहसा चुकवीत नसत. तसेच दर वर्षी सद्गुरु प.प.श्रीटेंबेस्वामीमहाराजांचा पुण्यतिथि उत्सव ते आपल्या घरा साजरा करीत. त्यांत सर्व चाळकरी उत्साहाने सहभागी होत.

## प.प.श्रीलोकनाथतीर्थ यांच्या पुण्याला भेटी.

१९२७ साली सद्गुरु चिन्मयानंद स्वामींनी आपले गुरु श्री१०८ प.प.श्रीशंकरपुरुषोत्तमतीर्थ स्वामी महाराजांकडून दंड घेतला व त्यांचे नांव (योगपट्ट) प.प.श्रीलोकनाथतीर्थ असे झाले. त्यानंतर १९२८च्या उन्हाळ्यांत स्वामिश्रींचे आगमन पुण्याला झाले. महाराजांच्या घरींच दोन महिने मुक्काम

झाला. भालेराव कुटुंबीयांचा परिचय झाला व श्री.भुजंगराव भालेराव यांना दीक्षा झाली. श्रीस्वामी महाराज त्यांच्याबरोबर त्यांच्या डोणजे या गांवीही जाऊन आले. पुण्याहून बार्शीला जाऊन स्वामीमहाराज उत्तरेकडे गेले. हरिद्वारला जाऊन तिथेच चातुर्मास केला. तिथे त्यांना हिंवतापाने गांठले. दोन आठवडे उपोषण करून स्वामीश्रींनी तापाला हटविले. पण अशक्तपणा खूप आला. चातुर्मासानंतर हृषीकेशला गेले. तिथे त्यांना महाराजांची आठवण आली म्हणून ते निघाले ते तडक पुण्याला दाखल झाले. कांही दिवस तिथे विश्रांति घेऊन, गुरुमहाराजांची आणि इतर साधकांची सेवा घेऊन, सगळ्यांच्या साधनाला चालना देऊन ते चातुर्मासानिमित्त नर्मदातीरी व्यासक्षेत्राला गेले. तेथील चातुर्मास संपतांच पुन्हा पुण्याला आले. दोन आठवड्यांच्या मुक्कामानंतर भुजंगराव भालेराव यांच्याबरोबर त्यांच्या गांवाकडे जाऊन आले. त्या प्रवासांत एका छोट्या अपघातांत स्वामीमहाराजांचा डावा हात दुखावला. पुण्याला परत येऊन त्यावर उपचार केले. हात बरा झाल्यावर त्यांनी पुणे सोडले आणि होशंगाबाद, दौंड, कुर्डुवाडी, मिरज मार्गे रामनवमीच्या दिवशा कुडुत्रीला आले. कुडुत्रीला महाराजांच्या कुटुंबीयांचा पाहुणचार घेऊन ते जवळच असलेल्या तारळ्याला तानुबाई बडकत्ते यांच्याकडे आणि मुरगुड यां गांवी सौ.रमाबाई जोशी महाराजांच्या भगिनी यांच्याही भेटी घेऊन आले. तिथून कोल्हापूरला जगदंबेचे दर्शन घेऊन होशंगाबादला कांही मुक्काम करून श्रीक्षेत्र काशी येथे गेले. यानंतर पांच-सहा वर्षांनीच स्वामी महाराज पुण्याला आलेले दिसतात. या सर्व काळांत महाराजांचा स्वामीमहारजांशी नियमित पत्रव्यवहार चालू होता. तसेच आपल्या तुटपुंज्या पगारांतूनही महाराज दरमहा श्रीस्वामीमहाराजांना गुरुदक्षिणा पाठवीत असत. त्याशिवायही कांही विशेष कारणांसाठी पैसे पाठवीत असत. स्वामीमहाराजांच्या प्रकृतीचीही पत्रद्वारे महाराज बारीक चौकशी करीत. कुणालाही पैसे न मागणारे स्वामीमहाराज 'वामन'ला मात्र हक्काने पैसे मागत. त्यांच्या "आई"चीच त्यांना तशी आज्ञा होत असे. १९३८पासून श्रीस्वामी महाराज जवळजवळ वर्षांतून एकदां तरी पुण्याला आले. त्या वेळी ते कधी गोवईकर चाळींत तर कधी इतर

शिष्यांकडे राहिले आहेत. १९४०साली त्यांना बेरीबेरी नांवाचा विकार होऊन हृदयावर परिणाम झाला. जांबुवंतसिंह या गुरुमहाराजांच्या शिष्याने त्यांची खूप सेवा केली. त्यानंतर ते कांही काळ पुण्यांत येऊन राहिले. महाराज व नाना भालेराव इत्यादि शिष्यांची सेवा व डॉ.बेंद्रे यांचा उपचार यांनी प्रकृती सुधारल्यावर ते काशीला परत गेले. तिथे गेल्यावर पुन्हा त्यांचा आजार वाढला. जांबुवंतसिंहाची स्वामींच्या आजाराने गंभीर स्वरूप धारण केल्याची तार आल्यावर महाराज स्वतः काशीला गेले. २-३ महिने तिथे राहून श्रीस्वामीमहाराजांची सेवा केली. जांबुवंतसिंह, भगवंतराव उपाध्ये आणि इतर साधक-शिष्यांच्या मदतीने स्वामींचा सेवा केली. श्रीलोकनाथतीर्थस्वामींची शेवटची पुण्याची भेट १९५१ साली झाली.

## कौटुंबिक आपत्ती.

१९३३ साली तारळे येथील महाराजांची बहीण तानुबाई यांच्या पतींना देवाज्ञा झाली. त्यानंतर सात-आठ महिन्यांतच (कार्तिक शु।।६) मातुःश्री उमामाता यांचेही निधन झाले. त्या वेळी त्या कुडुत्रीला होत्या. महाराजांनी त्यांच्या शेवटच्या आजारांत कुडुत्रीला जाऊन त्यांची सेवा केली. हा मातृवियोग महाराजांना दुःसह झाला. यानंतर गुळवणी कुटुंबाला विविध आपत्तींनी ग्रासले. गोविंदराव कर्जबाजारी झाले. महाराजांच्या दोन मोठ्या वहिनी दिवंगत झाल्या. पुण्यांत गोदूताईही (भालेराव) तापाने आजारी पडल्या. महाराजांची प्रकृतीही या काळांत बरी नव्हती. भालेराव कुटुंबांचाच काय तो आधार होता. अशांतच महाराजांचा एक भाचा श्रीपाद याला विषमज्वर झाला. त्याची व्यवस्था गोवईकर चाळींतच पहिल्या मजल्यावर वेगळी जागा घेऊन केली. त्याची आई सखूबाई त्याची शुश्रुषा करीत असे. पण तिला एकटीला ते न झेपल्याने महाराजांनीच बह्वंशी तीही जबाबदारी उचलली.

## दीक्षाकार्य.

या सर्वही काळांत महाराजांचे दीक्षाकार्य शांतपणे, प्रसिद्धीला चुकवीत चालू होते. अधूनमधून येणारे, एकटे-दुकटे मुमुक्षु महाराजांकडे दीक्षा घेऊन

कृतार्थ होत. त्यामुळे इथे कांही विशेष चालले आहे याची कल्पना इतरांना येत नसे. या साधनमार्गासंबंधी महाराजांनी (आपल्या अमृतमहोत्सवाच्या प्रसंगी) केलेल्या एकमेव  भाषणांत ते म्हणतात, **"या संप्रदायांतील साधक, त्यांच्या त्यांच्या पूर्वसंस्कारानुसार अनेक प्रकारचे दिव्य अनुभव आजही प्रत्यक्ष घेत असलेले दिसतात. या साधनाने असाध्य ठरलेल्या व्याधींचेही उपशमन झाले असल्याचाही अनुभव अनेक साधकांचा आहे. तसेच विकारी चित्तांतले मालिन्य कमी होऊन भावसंशुद्धी होत असल्याचाही साधकांचा अनुभव आहे. याप्रमाणे तपस्वी महात्म्यांनी संरक्षिलेल्या या योगसंप्रदायविद्येचे अवलंबन आबालवृद्धांनी करण्यास हरकत नाही. यथार्थ स्वार्थसिद्धीकरतां जरी जिज्ञासू सश्रद्ध सज्जनांनी या मार्गाचे अवलंबन केले तरी, ही राष्ट्रसाधनरूप असणारी अमोघ योगविद्या, भारताचा व तद्द्वारा विश्वाचाही अभ्युदय साधण्यास अत्यंत उपकारक ठरेल, अशी खात्री वाटते."**

हे ईश्वरी कार्य आहे याची त्यांना जाणीव होतीच. कधी कधी ही जाणीव दृढ होण्यासारखे प्रसंग घाडत. १९३४च्या हिंवाळ्यांत कोल्हापूरकडील एक दक्षिणामूर्तींची कृपा असलेले गृहस्थ महाराजांकडे आले. त्यांना त्या देवतेचे वरचेवर दृष्टांत होत व त्याप्रमाणेंच त्यांचा प्रपंच व साधना चालू होते. त्यांच्या इष्ट दैवतानेच त्यांना महाराजांची दीक्षा घेण्यास पाठविले. त्याना गुरुमहाराजांनी दीक्षा दिली. उत्तम अनुभवांनी कृतार्थ होऊन ते घरी गेले.

पण ही प्रच्छन्न दीक्षागंगा प्रकट व्हावी असाच ईश्वरी संकेत होता. गोरखपूरच्या 'कल्याण' मासिकाचा १९३५ या वर्षाचा अंक "योगांक" होता. त्यांत महाराजांचे संबंधी श्री.त्र्यंबकशास्त्री खरे (ऑडिटर) यांनी कुंडलिनी शक्तिपात योगावर लेख लिहिला. त्यांत महाराजांच्या इच्छेविरुद्ध त्यांचे नांव शक्तिपात दीक्षेचे अधिकारी योगी म्हणून पत्त्यासह प्रसिद्ध झाले. हे ऑ.खरे पुढे गोवर्धन पीठाचे शंकराचार्य झाले. या लेखामुळे महाराजांकडे भारतभरांतून जिज्ञासू लोक महाराजांकडे आकर्षित झाले. दीक्षागंगेचे पात्र चांगलेच प्रशस्त झाले. या गंगेत स्नान करून साधक झालेले मंगलदेव वेदालंकार नांवाचे आर्यसमाजी, ओधला सुप्रसिद्ध वेदाचे अभ्यासक व

योगाभ्यासी **पं. श्रीपाद दामोदर सातावळेकर** यांच्याकडे गेले. त्यांना ह्या पंथराजाची माहिती समजली. त्यांनी १९३७च्या मे महिन्यांत महाराजांच्याकडे येऊन साधनमार्गाची सर्व माहिती मिळवून आपल्या शंकांचेही निरसन केले. श्रीगुरुमहाराजांच्या अटी मान्य करून व वैदिक आचारपद्धतीचा स्वीकार केल्यावर त्यांना तीन महिन्यांनी दीक्षा झाली.

उपरिनिर्दिष्ट **श्री.खरे शास्त्री** ह्यांनी आपल्या **MBBS** करून **MD** च्या परीक्षेला बसत असलेल्या तिसऱ्या क्रमांकाच्या मुलाला पुण्याला आणून महाराजांना त्याला दीक्षा देण्याविषयी गळ घातली. त्या दीक्षेच्या वेळी खरेशास्त्रींना महाराजांच्या जवळच साक्षात् जगदंबा उभी आहे असे दर्शन झाले. दोघांच्या शरीरांतून प्रकाश पुंज निघून त्याचे एक वर्तुळ होतांना त्यांनी पाहिले.

**दीक्षेची पूर्वतयारी**:- महाराज आपल्याकडे दीक्षेसाठी आलेल्या मुमुक्षूंची परीक्षा करीतच, पण त्याचबरोबर दीक्षेच्छूंना साधनाची संपूर्ण माहिती, पाळावयाचे नियम इत्यादींची नीट माहिती करून देत. सर्वच इच्छुकांना दीक्षा होई असे नाही. बऱ्याच लोकांना कांही महिने किंवा वर्षेसुद्धा कांही उपासना करायला सांगत. त्यांच्या जीवनाच्या अंतिम पर्वांत मात्र महाराज दीक्षादानासंबंधी उदार झालेले दिसतात. आपला शिष्यपरिवार वाढविण्याची त्यांची मुळीच प्रवृत्ती नव्हती. आपला साधनमार्ग निश्चितपणे मोक्षपर्यवसायी आहे असा त्यांच्या मनांत पूर्ण आत्मविश्वास व श्रद्धा होती. जास्तीत जास्त मुमुक्षूंना तिचा लाभ व्हावा ही तळमळही होती. मात्र त्यासाठी साधकांची मनापासून तळमळ आणि आंतरिक योग्यता असणे महत्त्वाचे होते. ज्यांची तशी तयारी नसे त्यांची अन्य उपासनांद्वारा भूमिका झाल्यावर दीक्षा होत असे.

कुंडलिनी शक्तिपातयोगाने असाध्य विकारही बरे होतात असे तंत्रग्रंथांचे प्रतिपादन आहे. पण ही दीक्षा त्या कारणासाठी किंवा इतर कोणत्याही प्रापंचिक उद्देशाने देण्यास त्यांचा विरोध होता. दीक्षेच्छूंना ते तसे सांगतही व आपल्या दीक्षेमुळे कोणताही भौतिक लाभ होण्याची अपेक्षा ठेवू नये असेच सांगत. तरीही असे कांही लोक त्यांच्याकडे येत असत.

गुजरातेतील थुरावास या गांवचे **श्री.भगवंतराव उपाध्ये** दीक्षा घेण्याच्या उद्देशाने पुण्याला महाराजांकडे आले. त्यांच्या पाठीला एक एक असाध्य व्रण झाला होता. त्यामुळे, 'ते दुखणे बरे झाल्यावर दीक्षेचा विचार करूं,' असे महाराजांनी त्यांना सांगितले. पण भगवंतरावांचा असा समज झाली की महाराजांना कांही आर्थिक अपेक्षा असावी. म्हणून त्यांनी आपल्या बायकोची नथच आणून महाराजांपुढे दक्षिणा म्हणून ठेवली. महाराजांना धक्काच बसला. त्यांनी ती नथ ताबडतोब उचलायला त्यांना सांगितले आणि पैशाच्या कारणाने आपण दीक्षा देण्यास अनमान करत नसून कुठलाही विकार असतांना दीक्षा देण्यास शास्त्राचा निषेध असल्याने तसे केले, असे त्यांना समजाविले. अर्थात, भगवंतरावांना दुसरेच दिवशी दीक्षा झाली. भगवंतरावांचा दैवयोगच बलवत्तर असल्याने पुढे त्यांना प.प.श्रीलोकनाथतीर्थ स्वामीमहाराजांच्याही सहवासाचा योग आला. त्यांच्या सान्निध्यांत घडलेल्या साधनाने त्यांचा तो असाध्य व्रण एका वर्षांत पूर्ण बरा झाला. ह्याचे त्यांच्यावर उपचार करणाऱ्या डॉक्टरांनाही फार आश्चर्य वाटले.

दुसऱ्या संप्रदायांतील गुरूंच्या मार्गदर्शनाने कुणी साधन करीत असल्यास त्यांना महाराज दीक्षा देत नसत. सोलापूरचे **मोहोळकर** यांची एका श्रीविद्येतील एका अधिकारी गुरूंच्या मार्गदर्शनाखाली देवीची उपासना चालूं होती. त्यांनी वारंवार प्रार्थना केल्यावर त्यांच्या गुरूंकडून लेखी परवानगी आणल्यावरच त्यांना दीक्षा दिली. सांप्रदायिक मर्यादा महाराज कटाक्षाने पाळीत. वाडीच्या पुजाऱ्यांना ते गुरुस्थानी मानीत व त्यांच्यापैकी कुणालाही दीक्षा देत नसत. महान् पंडित दत्तभक्त श्री. आत्माराम शास्त्री जेरे यांना या कारणाने आपल्याला दीक्षा मिळत नाही याबद्दल खेद वाटे. वाडीच्या पुजाऱ्याना जन्मतःच श्रीदत्तप्रभूंची दीक्षा झालेली असते असे महाराज म्हणत.

कित्येक इच्छुकांना महाराजांनी "तुमचे गुरु दुसरे आहेत" असे सांगितले आहे. महान वारकरी संत प्रा. सोनोपंत दांडेकर यांनीही दीक्षेसाठी विचारले असतां "आपल्याला आवश्यकता नाही," असे त्यांना सांगितले. काशीचे प्रकांड **पंडित राजेश्वरशास्त्री द्रविड** यांनीही एकदां महाराजांकडे

दीक्षेचा विषय काढला होता. महाराजांनी लगेच उठून त्यांना साष्टांग नमस्कार घातला आणि म्हणाले, “आपण साक्षात् विश्वेश्वर आहांत.” ह्या प्रसंगानंतर त्यांच्या निकटवर्ती शिष्याने त्यांना विचारले, “महाराज! आपण त्यांना दीक्षा दिली असती तर आपल्या संप्रदायाची प्रतिष्ठा किती तरी वाढली असती?” त्यावर महाराज एवढेच बोलले, “तेच तर सांभाळायचे आहे!”

जानेवारी १९४० च्या कल्याण कल्पतरु या इंग्रजी मासिकांत महाराजांचा **“Transvission of Spiritual Power”** या शीर्षकाचा एक लेख आला. तो वाचून मुंबई राज्याचे तत्कालीन अर्थमंत्री **सर चुनीलाल मेहता** महाराजांकडे आले. लवकरच त्यांनी दीक्षेसाठी प्रार्थना केली. पतिपत्नींना दीक्षा झाली. त्यांनी महाराजांना आपल्या घरी नेऊन त्यांची पूजाही केली. त्यांना वाटले की महाराज आपले ऐश्वर्य पाहून कांही पैशाची वगैरे मागणी करतील. पण तसे कांहीच झाले नाही. तेव्हां न राहवून त्यांनीच महाराजांना कांही पाहिजे कां असे विचारले. महाराजांनी आपल्याला कांहीच नको असल्याचे सांगितले. तरीही त्यांनी महाराजांना एखादे घर बांधून देऊन त्यांच्या निर्वाहाची आर्थिक तरतूद करण्याची आपली इच्छा वारंवार व्यक्त केली. महाराजांनी स्पष्ट नकार देऊन सांगितले कीं, “आत्तां जर तुमचे उपकार घेतले तर ते फेडायला किती जन्म घ्यावे लागतील!” महाराजांचे दीक्षाकार्य किती निरपेक्षपणे चालले होते त्याची थोडी कल्पना यावरून येऊं शकेल.

या काळांतच काशीचे **जांबवंतसिंह** नांवाचे कापडाचे व्यापारी सद्‌गुरुभेटीच्या तळमळीने महाराजांकडे आले. त्यांना गुरुप्राप्तीसाठी पुण्याला जाण्यविषयी स्वप्नदृष्टांत झाला होता. पुण्यांत कल्याणचा योगांक व त्यांतील खरेशास्त्रींचा लेख वाचण्यांत आला. अशा रीतीने महाराजांचे नांव आणि पत्ता मिळाल्यावर त्यांचा शोध काढीत महाराजांना त्यांनी नूतन मराठी विद्‌यालयाच्या वार्षिक स्नेहसंमेलनांत गांठले. समारंभातून बाहेर येऊन महाराजांनी जांबुवंतसिंहांची प्रार्थना ऐकली आणि सोयिस्कर जागा आणि वेळ ठरवून त्याला दीक्षा दिली. पुढे जांबुवंतसिंहजी काशीचे आहेत हे

समजल्यावर त्यांना सद्गुरु लोकनाथतीर्थ स्वामी महाराजांची यथाशक्य तन-मन-धनांनी सेवा करण्यास सांगितले. त्याप्रमाणे जांबवंतसिंहानी स्वामीमहाराजांची अखेरपर्यंत निरलस, निरपेक्ष, समर्पित सेवा केली.

**पं.योगींद्रकृष्ण दौर्गादत्तीशास्त्री** हे ईडर (म.प्र.) संस्थानाचे वंशपरंपरेने कुलगुरु होते. त्यांच्या घरांत सात पिढ्याहून अधिक श्रीविद्येची उपासना चालत आलेली होती. त्यामुळे शक्तिपात हा विषयाचे त्याचे ज्ञान परिपूर्ण होते. तरीही अनभव मात्र कांहीच नव्हता. महाराजांचे अनुग्रहीत श्री.गुलाबसिंह रानडे (झेलम) हे शास्त्रीबुवांची मंत्रशास्त्रांतील कीर्ति ऐकून श्रीगुरुमहाराजांच्या परवानगी घेऊन त्यांच्याकडून मंत्रोपदेश घेण्यासाठी आले. मंत्रोपदेश झाल्यावर तेथेच गुलाबसिंह मंत्रजप करीत बसले. त्या वेळी त्यांना अचानक घूर्णादि क्रिया व्हायला लागल्या आणि ते देहभान हरपून गेले. शास्त्रीमहाराजांनी त्यांच्या क्रिया व अवस्था पाहतांच ओळखले कीं या कुंडलिनीजाग्रतीच्या क्रिया आहेत. त्या आपल्या मंत्राच्या नाहीत हेही ओळखले आणि गुलाबसिंहाना ही विद्या कुठे मिळाली ते विचारली. त्यांच्याकडून श्रीगुरुमहाराजांची माहिती मिळतांच त्यांनी लगेच त्याच्याशी पत्रव्यवहार करून पत्रद्वारे दीक्षा घेतली. पुढे ईडरच्या राजपुत्रांनाही हे समजल्यावर त्यांनी पुण्याला येऊन महाराजांकडून दीक्षा घेतली.

**संन्यासांना दीक्षा:-** खेड (राजगुरुनगर) येथील प.प.श्रीप्रज्ञानानंदसरस्वती(कर्वे स्वामी) १९४३मध्ये महाराजांकडे आले. हे संत तुळशीदासांचे भक्त असून श्रीतुसलीरामायणाचे त्यांचे मराठी भाषांतर प्रसिद्ध आहे. मराठवाड्यांत परांडा येथे त्यांची समाधि आहे. त्यांनी दीक्षेची विनंति केल्यावर महाराजांनी प्रथम “आपण चतुर्थाश्रमी असून आम्हाला गुरुस्थानी आहांत. आम्ही आपल्याला कशी दीक्षा देणार?” अशी शंका व्यक्त केली परंतु त्यांचा आग्रह पाहून त्यांनी त्यांचे यथाविधि पूजन करून त्यांना दीक्षेचीच दक्षिणा दिली. द्विसाहस्रीत आठ गांवच्या ब्राह्मणांनी श्रीगुरूंना मागितलेल्या दक्षिणेचे स्मरण होते. “श्रूयते दृश्यतेऽदो यत्त्वन्मायेदं दुरत्यया। मा वृणोत्विति भो श्रीमन् देहि नो दक्षिणां वराम्।।”द्वि.सा. २२:३२।।**)**. यानंतरही अनेक यतींना अशा प्रकारेच दीक्षा झाल्या.

**कुंडलिनीचे स्वतः जागरण:-** प्राणायाम, गायत्रीजप आदि उपायांनी किंवा क्वचित् पूर्वसंचितानेसुद्धां कुंडलिनी शक्ति जागृत होते. अशा लोकांना अधिकारी मार्गदर्शन न मिळाल्याने त्यांना त्याचा त्रास होऊं शकतो. १९४३च्या जानेवारी महिन्यांत एक आनंदराव लेले नांवाचे साधक महाराजांकडे आले. २५ वर्षं गायत्रीची उपासना केल्यावर त्याची शक्ति जागृत झाली. पण पूर्वी नाडीशुद्धि झाली नसल्याने त्यांना त्रास होत होता. महाराजांनी संकल्पपूर्वक शक्तिपात केल्यावर त्यांना प्राणायामादि नाडीशुद्धीच्या क्रिया सुरू झाल्या व त्यांचे साधन सुरळीत सुरू झाले. ठाणे येथील श्री.नाना पटवर्धन यांची कुंडलिनी आपोआप जागृत झाली. त्यामुळे येणाऱ्या चमत्कारिक अनुभवांनी आणि शारीरिक क्रियांनी ते बावरून गेले. आपल्याला कांही तरी व्याधि झाली आहे या समजुतीने त्यांनी डॉक्टरांचे उपाय केले. बऱ्याच काळानंतर त्यांना महाराजांचे दर्शन झाले आणि त्यांच्या कृपादृष्टीने त्यांना बरे वाटूं लागले. त्यांना ह्या साधनमार्गाची माहिती देऊन पुढे दीक्षा झाली.

**स्थलकालनिरपेक्ष दीक्षा:-** शक्तिपातदीक्षेत सद्गुरूंचा संकल्पच मुख्य नसल्याने, स्थल, काल, विधि विधान इत्यादि बाह्य गोष्टींना फारसे महत्त्व नसते. तरीही श्रीगुरुमहाराज दीक्षा देतांना, गुरूचा अस्त, पितृपक्ष इत्यादि टाळून दिनशुद्धी पाहूनच दीक्षा देत. शक्य तो साधकाच्या किंवा आपल्या घरी किंवा पुढे आश्रमांत देवापुढे बसायला सांगत. काशीच्या वाटेवर (१९४४) खापरखेडा या गांवाहून सहा मैल पिपारिया स्थानकावर महाराजांना मध्यरात्रीची गाडी धरायची होती. ह्या गांवांत गांवातील जवळजवल सगळेच दीक्षित होते. सगळे महाराजांना निरोप द्यायला आले. तिथे दोन स्त्रियांनी तिथल्या तिथेच दीक्षेचा आग्रह धरला. गांवच्या साधक मंडळींनीही त्याच्या वतीने बरीच गळ घातली. महाराजांच्या बरेच सांगूनही त्यांचा आग्रह थांबेना. अखेर महाराजाना त्यांचा हट्ट पुरवावाच लागला. त्यांनी सर्व मंडळींना त्या स्त्रियांभोंवती कडे करून जागा करायला सांगितली. तशी त्या वेळी स्टेशनवर गर्दीही नव्हती. त्या जागी त्या दोघींना बसायला सांगितले. त्या स्त्रियांना तीव्र संवेगाच्या क्रिया सुरू झाल्या व स्थानकावर जास्त गोंधळ होऊं नये

म्हणून बरोबरच्या लोकांना त्यांच्या क्रियांना आवर घालावा लागला. सोलापूरकर नांवाच्या साधकांना महाराजांचे स्टेशनवर दर्शन होतांच शक्तिसंचाराचे अनुभव आले. प्रस्तुत लेखकासहित अनेकांना महाराजांच्या प्रथम दर्शनानेच कुंडलिनीजागरणाचे अनुभव आलेले आहेत.

न मागतां दीक्षा झाल्याचे एकच उदाहरण आढळते. वारकरी संप्रदायाचे ह.भ.प.ज्ञानेश्वर कोंडिबा (माउलू) काळे यांना १९६२च्या महाराजांनी दसऱ्याच्या दिवशी आग्रहाने बोलावून दीक्षा दिली.

**संकल्पदीक्षा**:- शिष्याची कुंडलिनी शक्ति जागविण्यासाठी श्रीगुरुमहाजांना त्याच्या सान्निध्याची आवश्यकता नसे. दूर राहणाऱ्या - समुद्रापलीकडील परदेशांतील शिष्यानाही केवळ संकल्पाने दीक्षा झालेल्या आहेत. विशेशतः उत्तरायुष्यांत महाराजानी बहुतेक दीक्षा पत्राद्वारे संकल्पानेच दिल्या आहेत.

**संप्रदायाचे सामर्थ्य**:- श्रीगुरुचरणदास नांवाच्या एका साधकांनी प.प.श्रीशंकरपुरुषोत्तमतीर्थ महाराजांकडून दीक्षा घेतली. पण श्रद्धापूर्वक नियमित साधनाभ्यासानंतरही त्यांना म्हणावे तसे अनुभव येत नव्हते. नंतर ते श्रीलोकनाथतीर्थ स्वामी महाराजांनाही भेटले. त्यांच्या सान्निध्यांत कांही दिवस साधन करूनही त्यांना अनुभव आले नाहीत. मग ते श्रीगुरुमहाराजांचा शोध करीत आले. होशंगाबादच्या अनुष्ठानांत त्यांना महाराजांबरोबर साधनाला बसण्याचा योग आला. त्यानंतर मात्र त्यांना उत्तम अनुभव येऊन त्यांची प्रगती झाली. ह्या घटनेविषयीं महाराजा म्हणतात, **“माझ्या आत्तांपर्यंतच्या अनुभवावरून हे सामर्थ्य व्यक्तीचे नसून संप्रदायाचे आहे**.”

**वयोमर्यादा:-** प्रस्तुत लेखकाच्या आठ वर्षाच्या कन्येला आपल्या आईवडिलींचे साधन पाहून दीक्षा घेण्याची इच्छा झाली. तिने आपल्या हाताने एक पत्र लिहून श्रीगुरुमहाराजांची प्रार्थना केली. आणि आश्चर्य असे की तिला लगेच विजयादशमीच्या मुहूर्तावर दीक्षाही झाली. याहूनही लहान वयांत दीक्षा झाल्याची उदाहरणे आहेत. तसेच वयाची ऐंशी वर्षे उलटलेल्यांनाही दीक्षा झाल्या आहेत. श्रीथोरले महाराज श्रीदत्तपुराणांत लिहितात**:-**

**सुषुम्णाज्ञो नरो स्त्री वा युवा बालो जरन्नपि।**

**योगाभ्यासेऽभ्यधिकारी स्यादभ्यासात्सिद्धिभागपि।। २:२:१।।**

**सांप्रदायिक मर्यादा**:- प.प. श्रीशंकरपुरुषोत्तमतीर्थ महाराज यांनी केवळ बंगाली मुमुक्षूंना त्यांची श्रद्धा, भक्ति, सदाचरण इत्यादि अधिकार पाहून दीक्षा दिल्या. बंगाल्यांच्या व्यतिरिक्त त्यांनी शिष्य केले नाहीत असे दिसते. प.प.श्रीलोकनाथतीर्थ स्वामीमहाराजांनी मात्र दीक्षा देतांना साधकाची पात्रता पाहून अन्य प्रांतीयांनाही दीक्षा दिल्या. तरी त्यांना शिष्यपरिवार वाढविणे ('दल बढाना') रुचत नव्हते. त्यांनी क्वचित् आर्यसमाजी साधकांना दीक्षा दिल्या असल्या तरी शक्य तों वैदिक मतानुयायी शिष्यांनाच दीक्षा देण्याचा त्यांचा परिपाठ होता. दीक्षेच्छूंनी आचारांत बदल केल्यावर तसेच त्यांच्याकडून जप, अनुष्ठानादि करवूनही मगच दीक्षा दिल्याची उदाहरणे आहेत. 'आईची इच्छा' हाच प्रमुख निकष त्यांनी लावला.

आरंभीच्या काळांत श्रीगुरुमहाराजांनीही हेच धोरण अवलंबिलेले दिसते. पुढे मात्र, कदाचित ह्या दीक्षेच्या व साधनप्रणालीच्या शास्त्रप्रणीत तसेच अनुभवजन्य ज्ञानामुळे श्रीगुरुमहाराजांनी दीक्षादानाच्या विषयांत अधिक उदारता दाखविली. त्यांनी बऱ्याच परधर्मीयांनाही दीक्षा दिल्या आहेत. मात्र दीक्षा घेतांना त्या साधकाकडून विशिष्ट आचारसंहिता पाळण्याचे व नियमित साधन करण्याचे वचन कटाक्षाने घेत असत. वर उद्धृत केलेल्या श्लोकाच्या पुढच्याच श्लोकांत श्रीस्वामीमहारजांनी याची **"सर्वेऽप्याश्रमिणो वर्णा योगाभ्यासेऽधिकारिणः"** असे म्हणून याची पुष्टीच केली आहे. परात्पर गुरु प.प.श्रीनारायणतीर्थदेवांनीही मुसलमान शिष्याला दीक्षा दिल्याचा उल्लेख आहे. यावरून श्रीगुरुमहाराजांनी संप्रदाय आणि वृद्धाचाराला अनुसरूनच या दीक्षा दिल्या आहेत हे स्पष्ट होते.

न्यूयॉर्क येथील **विवेकानंद मिशनचे प्राचार्य डॉ..वॉलकॉट** यांनी १९६० साली गोवईकरांच्या चाळींत येऊन प्रार्थना केल्यावर त्यांच्याशी प्रा.मिश्रा नांवाच्या दुभाष्यांच्या साहयाने सविस्तर संवाद करून ते आहारविहाराचे सर्व नियम तत्परतेने पाळीत असल्याची खात्री करून घेऊनच त्यांना दीक्षा दिली.

महाराजांचे एक छायाचित्रकार शिष्य श्री.गायकवाड, हरिद्वारला महाराजांचे छायाचित्र समोर ठेवून पूजा करतांना एका **फ्रेंच जोडप्याने** पाहिले. त्या गृहस्थाने गायकवाड यांना श्रीगुरुमहाराजांची आपल्याला स्वप्नांत दीक्षा झाल्याचे सांगून महाराजाची माहिती घेतली व ते पुण्यांत त्यांच्या भेटीला आले. भारतीय पद्धतीनुसार त्या दंपतीने पादत्राणे काढून हातपाय धुवून घरांत येऊन महाराजांचे दर्शन घेतेले. महाराज त्या दोघांशी त्यांच्या (फ्रेंच) भाषेत बराच काळ बोलले असे गु.भ.नाराणराव भालेरावांनी लिहिले आहे.

श्रीगुरुमहाराजांच्या शिष्यपरिवारांत आर्यसमाजी, वीरशैव, जैन, शीख आदि अवैदिक भारतीय धर्माचे अनुयायी आहेत तसेच पारसिक, ख्रिश्चन, मुस्लिम इत्यादि धर्मांचे अनुयायीसुद्धा आहेत.

**निग्रहानुग्रहसामर्थ्य**:- सद्‌गुरूंना शक्ति जागृत करण्याचे सामर्थ्य असते तसेच ती थांबविण्याचेही असते. एका जैन साधकाला पत्राद्वारे महाराजांची दीक्षा झाली. पण उपवासाने क्षीण झालेल्या त्याच्या शरीराला साधनाची तीव्रता सहन झाली नाही. तेव्हां महाराजांनी पत्राद्वारेच त्याची साधना स्थगित केली. वर्ष दोन वर्षांनी त्याचे पुन्हा पश्चात्तापाचे आणि क्षमायाचनेचे पत्र आले. महाराजाना दया आली व त्याची साधना पुनश्च सुरू झाली. अशी अनेक उदाहरणे आहेत.

## तीर्थयात्रा.

१९४० च्या डिसेंबर महिन्यांत काशींत सद्‌गुरु लोकनाथतीर्थ स्वामीमहाराजांची प्रकृती सुधारल्यावर महाराजांनी गया, कलकत्ता, ब्रह्मावर्त, अयोध्या, हरिद्वार, मथुरा इत्यादि क्षेत्रांची यात्रा केली आणि होशंगाबादमार्गे पुण्याला आले. तीर्थयात्रेची सांगता म्हणून वाडीला जाऊन दर्शन-पूजन करून आले. त्या वेळी श्रीस्वामी महाराजांचा मुक्काम पुण्यात होता. त्यांच्याबरोबर डोंबिवली, भंडारा, आजेगांव इत्यादि ठिकाणी जाऊन पुढे श्रीशैल्य आणि गोकर्ण या क्षेत्राचीही यात्रा केली. यानंतर दोन-तीन महिने पुण्यांत राहून शाळेच्या परीक्षा झाल्यावर महाराजांनी होशंगाबादला जाऊन ३-४ महिने एकांतात अनुष्ठान केले. शंकरकाका आजेगांवकर या वेळीही

बरोबर होते. आणखी दोघे साधक होते. श्री.गुरुचरणदास यांचा उल्लेख वर आलाच आहे. संपूर्ण दिवस योगाभ्यास, गायत्रीजप, गुरुचरित्रपठण इत्यादि अनुष्ठानांतच जात असे. इथे महाराजांनी परमगुरु श्री.प.प.शंकरपुरुषोत्तमतीर्थ महाराजांच्या 'योगवाणी' ह्या ग्रंथाचे मराठी भाषांतर केले.

# सेवानिवृत्ती.

अगदी लहान वयांपासूनच श्रीगुरुमहाराजांची अशी दृढ श्रद्धा होती की जे होते ते सर्व ईश्वरी नियोजनानेच होते. त्यामुळे कुठल्याही प्रिय वा अप्रिय घटनेचा स्वीकार ते समचित्तानेच करीत. हे त्यांच्या पूर्व जन्मींच्या अभ्यासाचेच द्योतक आहे. आपण पूर्वी पाहिल्याप्रमाणे उत्तम अभ्यास असूनही ऐन मॅट्रिकच्या परीक्षेच्या वेळी त्यांना जे जे स्कूलच्या प्रवेशासाठी मुंबईला जावे लागले. त्यांचा ना त्यांनी खेद केला ना पुन्हा परीक्षेचा प्रयत्न केला. आपण ही परीक्षा द्यावी अशी ईश्वरी इच्छा नाही ह्या श्रद्धेशिवाय हे घडणार नाही. त्याचप्रमाणे चित्रकलेची उच्च श्रेणीच्या परीक्षेच्या वेळींच त्यांना प्लेग झाला. त्यानंतर त्या परीक्षेलाही ते पुन्हा बसले नाहीत. "माळियें जेउतें नेले। तेऊं ते निवातचि गेले। तया पाणियाऐसे केले। होआवे जी धनंजया।।" या ज्ञानेश्वर माउलींच्या वचनानुसार ते जीवनांतील सर्वच घटनांना कसलाही प्रतिकार किंवा आक्रोश न करतां आदराने आणि आनंदाने सामोरे जात. या कारणाने त्यांच्याजवळ त्यांच्या चित्रकलेच्या व शैक्षणिक अर्हतेचे कसलेच प्रमाणपत्र नव्हते. त्याचे त्यांना मुळीच वैषम्य वाटले नाही किंवा ती प्राप्त करण्याचा त्यांनी प्रयत्नही केला नाही. ही अकर्मण्यता नव्हती तर प्रारब्धाचा सहर्ष स्वीकार करण्याची ज्ञानी पुरुषाची सहज वृत्ती होती. ह्याच वृत्तीचा प्रत्यय त्यांच्या सेवानिवृत्तीच्या प्रसंगांतही येतो. बार्शीच्या शाळेत किंवा नू.म.वि.मध्ये त्यांची नेमणूक झाली त्यावेळी कुणीही त्यांची प्रमाणपत्रे विचारली नाहीत. १९२६ ते १९४२ अशी सोळा वर्षे उत्तम प्रकारे नोकरी झाली. ही हंगामी स्वरूपाचीच होती. १९४२ साली ती कायम स्वरूपाची करण्याच्या निमित्ताने त्यांच्याकडे प्रमाणपत्रांची मागणी झाली. यांत कांही वैयक्तिक आकसाचाही भाग असावा. इतकी वर्षे नोकरी

झाल्यावर आतां नोकरीची फक्त तीन वर्षेच राहिलेली असतां ही मागणी झाली याचा अर्थ महाराजांनी असा काढला की आपल हे प्रारब्ध संपुष्टांत आले आहे. आतां आपण नोकरी करावी अशी ईश्वरी इच्छा नाही. त्यांनी तात्काळ राजीनामा देऊन स्वेच्छानिवृत्ती स्वीकारली. त्यांनी हे रागाच्या भरांत केले असे वाटून त्यांच्याविषयी सहानुभूति असलेल्या, तसेच स्वतःच्या अधिकारांत दोन वर्षे नेमणूक वाढविण्यास तयार असलेल्या प्राचार्य नारळीकरांना, त्यांनी आपल्या राजीनाम्याच्या पाठीमागची वैचारिक बैठक विशद केली व शांतपणे त्यांचा निरोप घेतला.

सेवानिवृत्तीनंतर महाराजांनी प्रथम आपली राहती जागा आपले शिष्य श्री.नारायणराव मोघे यांच्या नांवावर केली. ते पुण्यांत एकटेच रहात होते व महाराज पुम्यांत असतांना त्यांना तिथे राहण्याची सोय होती. महाराजांचे देवही तिथेच होते. त्यांच्या पूजे-अर्चेची जबाबदारी गु.भ.नाना भालेराव यांच्यावर सोंपवली. शाळेकडून मिळालेले प्रॉ.फंडाचे पैसे भगिनी गोदावरीच्या निर्वाहाला दिले आणि महाराजा खऱ्या अर्थाने अकिंचन झाले. परमेश्वरावर संपूर्ण भार टाकून जो परिग्रहच विसरून जातो त्याला एकनाथमहाराज अकिंचन म्हणतात. हा महाराजांचा विद्वत्संन्यासच झाला असे म्हणणे योग्य ठरेल.

आतांपर्यंतच्या आयुष्यांत महाराजांनी शेंकडो माणसे जोडली. त्यानंतर तर हजारों शिष्यांना त्यांनी कृतार्थ केले. त्या सर्वांवर महाराजांनी आपल्या पुत्रांप्रमाणे प्रेम केले. तोच त्यांचा विशाल प्रपंच झाला. नोकरी होती तोंवर पुण्यांत राहणे आवश्यक होते. पण त्याही काळांत महाराज वारंवार प्रवास करतांना दिसतात. तो सर्व तीर्थयात्रा व धार्मिक अनुष्ठाने यांच्या निमित्तानेच झालेला दिसतो. यानंतरचा बराच काळ महाराजांचे वास्तव्य पुण्याच्या बाहेर झालेले दिसते. १९४२च्या प्रारंभी नोकरीतून निवृत्त होतांच महाराज सोलापूरला गेले. तिथे पू.यशवंतराव वैद्य मास्तर ह्याच्या घरी ते जवळपास दोन वर्षे राहिले. तिथे त्यांनी श्रीगुरुचरित्राच्या सात सप्ताहांचे अनुष्ठान मौन व उपवास करून केले. सद्गुरु श्रीटेंबेस्वामींच्या पुण्यतिथीला, गुरुद्वादशीला वाडीला जातांना ते पुण्याला येत असत. दिवाळीनंतर

श्रीलोकनाथतीर्थ स्वामी महाराजांचा मुक्काम पुण्यात असतांना ते चारपांच दिवस त्यांच्या सेवेत राहून परत सोलापूरला गेले. सोलापूर येथे महायोगविज्ञान या ग्रंथाच्या महत्त्वाच्या भागाचे मराठी भाषांतर त्यांनी केले.

# चौदा तासांची समाधि.

मार्च १९४४ मध्ये शंकररव मार्कंड यांनी सद्गुरु लोकनाथतीर्थ स्वामी महाराजांसाठी काशीत आश्रम करण्याचे ठरविले. त्या निमित्ताने महाराज काशीला गेले व तिथे दोन महिने मुक्काम झाला. या मुक्कामांत परमगुरु श्री१०८श्रीशंकरपुरुषोत्तमतीर्थ स्वामी महाराजांच्या दर्शनाचा योग आला. परमगुरूंनी आठवण काढून भेटायला बोलावल्यावरच श्रीलोकनाथतार्थस्वामींनी महाराजांना त्यांना छोट्या गैबीच्या आश्रमांत नेले. महाराजांनी हार, फळे, मिठाई घेऊन उत्तम प्रकारे परमगुरूंचे पूजन केले, त्यानंतरही महाराज मधून मधून छोटी गैबीच्या आश्रमांत साधनेला जात असत. एकदां ते पहांटे पांच वाजतां साधनेला बसले ते संध्याकाळी सात वाजतांच उठले. परमगुरदेव श्रीशंकरपुरुषोत्तमानंदांनी सकाळी जाऊन ती बैठक पाहिली आणि आपले समवयीन शिष्य स्वामी प्रणवानंद यांनाही दाखविली. त्यावेळी श्रीगुरुमहाराजांचे शरीर काष्ठवत्, निश्चल झाले होते व श्वासोच्छवास पूर्णपणे थांबला होता. (केवल कुंभक). सर्व शरीर थंडगार झाले होते आणि फक्त टाळूजवळच थोडी उष्णता जाणवत होती. दुपारी चारनंतरही जेव्हां ही अवस्था बदलली नाही तेव्हां शंकरपुरुषोत्तम स्वामी महारजांनाही चिंता वाटूं लागली. अखेर त्यांनी सर्व भार जगदंबेवर टाकला. संध्याकाळी सात वाजतां महाराजांचे समाधीतून व्युत्थान झाले. परमगुरुदेवांना हा मोठाच कौतुकाचा विषय झाला. महाराजांची योग्यता आश्रमवासीयांच्या लक्षांत आली.

सेवानिवृत्तीनंतरच्या १५ वर्षांच्या काळांत महाराज पुण्याच्या बाहेरच अधिक राहिलेले दिसतात. पुण्यांत जसे नाना भालेराव तसेच सोलापूरला वैद्य मास्तर आणि बापूसाहेब कुबडे, हिंगोली-आजेगांवला शंकरकाका आजेगांवकर ही मंडळी सहकुटुंब महाराजांना समर्पित होती. १९४६ हे

श्रीगुरुमहाराजांचे षष्ट्यब्दिपूर्तीचे वर्ष होते. ते थाटाने साजरे करण्याची शंकरकाकांची इच्छा होती. पण महाराजाची प्रथम त्याला विरोधच केला. तो विषय टाळण्याच्या हेतूने त्यांनी वाडीला त्यानिमित्त महापूजा, वस्त्रे, पालखी इत्यादि सेवा करून उग्ररथी शांतीचे होमहवनही स्वतः केले. तरी पण शंकरकाकांनी आत्मीयतेने आणि उत्साहाने महाराजांची साठी शांती हिंगोली येथे आयोजित केलीच. हा समारंभ पुण्याहून दूर झाल्याने थोडक्यांतच झाला असला तरी बऱ्यापैकी थाटांत साजरा झाला. होम-हवन, दशदाने, गोप्रदाने, सुवर्णदाने, वस्त्रदाने, शंभर ब्राह्मणांना भोजन इत्यादि सर्व विधि यथासांग पार पडले.

ह्याच सुमारास काशी येथे गुरुभक्त शंकरराव मार्कंड यांच्या प्रयत्नाने प.प.श्रीलोकनाथतीर्थ स्वामीमहाराजांचा आश्रम बांधून झाला व त्याची वास्तुशांति झाली. महाराज षष्ट्यब्दीमुळे जाऊं शकत नव्हते. त्यांनी दहा रुपयांची म.ऑ.पाठविली. याच काळांत महाराजांचे ज्येष्ठ बंधु शंकरशास्त्री यांनी संन्यास घेतला. प.प.श्रीशंकरानंद भारती हा त्यांचा योगपट्ट. पुढे ते आयुष्यभर वाडीतच राहिले.

## प.प.सद्गुरु श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामी महाराज यांच्या समग्र ग्रंथांचे प्रकाशन.

प.प.सद्गुरु श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामी महाराज यांनी श्रीदत्तसंप्रदायाच्या पुनरुज्जीवनाचे जे महान कार्य केले आहे त्याचा एक प्रधान, प्रभावी आणि चिरंतन भाग म्हणजे त्यांचे वाङ्मय होय. १९व्या शतकांत कोंकणातल्या एका लहान खेड्यात, गरीब ब्राह्मण कुटुंबांत जन्म घेतलेल्या, शिक्षणासाठी कुठेही बाहेर न गेलेल्या, कुठलाहि ग्रंथसंग्रह उपलब्ध नसलेल्या एका संन्याशाने, सर्व भारतभर प्रवास करीत. अनेक व्याधींना तोंड देत, अत्यंत कठिण व्रतांचे कांटेकोर आचरण करीत, तहान-भूक, उपास-तापास, ऊन-पाऊस ही द्वंद्वे सहन करीत, हे अलौकिक वाङ्मय निर्माण केले आहे. आज शतकाधिक वर्षांनी ते केवळ टिकूनच आहे असे नाही तर हजारों आर्त, अर्थार्थी, जिज्ञासू दत्तभक्तांना आश्रयभूत झालेले आहे. त्यांचे एक अधिकारी विद्वान शिष्य प.पू.धुंडीराजमहाराज म्हणतात, प.प.

श्रीस्वामिमहाराजांचे वाङ्मय "*अनन्यसाधारण, श्रीशप्रेरणेने निर्माण झालेले, स्वयंस्फूर्त, प्रसन्न, ईशप्रसादयुक्त, ग्राहकांना फलद्रूप होणारे, सर्वत्र प्रसिद्धीस पावून सर्वांना पटणारे असे सहज आविर्भूत झालेले आहे ....... गुरुमहाराज हे ईश्वरी अवतार असल्याने त्यांचे काव्य अधिकारीवाणीरूप अर्थात् निखिलादरणीय, इष्टापादक असेच आहे यांत संशय नाही.*" प्रकांड पंडितांनी त्यांच्या वाङ्मयाची विस्ताराची, व्यापकतेची, गहनतेची, प्रासादिकतेची आणि विविधतेची तुलना श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या वाङ्मयाशी केलेली आहे. मुख्यतः मराठी आणि संस्कृत भाषांतून श्रीस्वामिमहाराजांनी आपल्या दिव्य आणि चतुरस्र प्रतिभेचे दर्शन घडविले आहे. श्रीदत्तप्रभू आणि त्यांचे कलियुगांतील दोन अवतार श्रीपादश्रीवल्लभ व श्रीमन्नृसिंहसरस्वती यांची चरित्रे, स्वरूप, तत्त्वज्ञान, कार्य आणि मुख्य म्हणजे उपासना हेच या वाङ्मयाचे विषय होत. सर्व प्रकारच्या दत्तभक्तांना आपापल्या अधिकारानुरूप परमार्थमार्गाचे पाथेय श्रीस्वामिमहाराजांनी निर्माण केले आहे - नव्हे श्रीदत्तभगवंतांनीच त्यांच्या माध्यमांतून निर्माण करविले आहे ! अति सरल गेय भक्तिरसपूर्ण अशी मराठी पदे जशी त्यांनी केली तशाच नाना वृत्तांनी सुबद्ध आणि विविध अलंकारांनी सजलेल्या संस्कृत रचनाही केल्या. श्रीगुरुचरित्र आणि श्रीदत्तचरित्र यांच्यांत तात्त्विक प्रमेये त्यांनी उकलून दाखविली तशीच श्रीदत्तसंप्रदायांतील गूढ परमार्थसाधनेही प्रकट केली.

असे हे वाङ्मय बह्वंशी अप्रकाशितच होते. कुठे कुठे, कुणी कुणी श्रीगुरुचरितम् (द्विसाहस्री), दत्तमाहात्म्य असे ग्रंथ छापून प्रसिद्ध केले होते. श्रीगुरुमहाराज आणि श्री.शंकरकाका आजेगांवकर प्रमुख त्यांच्या गुरुबंधूंची हे समग्र वाङ्मय छापून प्रसिद्ध करावे अशी तळमळ होती. श्रीथओरले स्वामी महाराजांनी आपल्या बहुतेक मोठ्या ग्रंथांची हस्तलिखिते आपले प्रिय आणि एकमेव संन्यासी शिष्य वाडीचे प.प.श्रीनृसिंहसरस्वती (दीक्षित) स्वामीमहाराज यांच्याकडे पाठवीत असत. श्रीदीक्षितस्वामी पुढे वाडी सोडून कृष्णेच्या पैलतीरावर औरवाड (अमरापूर) येथे गेले व तिथेच त्यांनी “श्रीवासुदेवानंद सरस्वती पीठ.” स्थापन करून तिथे ह्या पोथ्या ठेवल्या

होत्या याशिवायही सर्व भारतभर त्यांची संकीर्ण हस्तलिखिते त्यांच्या भक्तांकडे विखुरलेली होती. ह्या सर्वांचे संकलन तसेच संपादन करून त्यांचे प्रकाशन करणे हे मोठे जिकीरीचे व खर्चाचेही काम होते. श्रीथोरल्या स्वामीमहाराजांचे बहुतेक ग्रंथ संस्कृत भाषेतूनच असल्याने त्यासाठी व्युत्पन्न संस्कृत विद्वानांचा सक्रिय सहभाग आवश्यक होता. श्रीशंकरकाका आणि महाराज यांनी विचाराअंती असे ठरविले की पुण्यातच टिळक महाविद्यालयांत वेदांत आणि न्याय या विषयांचे अध्यापन करणारे, प.प.दीक्षितस्वामींचे अनुग्रहीत पं.दत्तात्रेयशास्त्री कवीश्वर ह्यांच्यावर ग्रंथसंपादनाची जबाबदारी सोपवावी. त्याप्रमाणे त्याप्रमाणे १९५०च्या विजयादशमीला श्रीगुरुमहाराजांच्या अध्यक्षतेखाली एक अकरा सदस्यांची समिति स्थापन करून पं.दत्तात्रेयशास्त्रींना कार्यवाहपद सोपविले.

हे ग्रंथप्रकाशनाचे कार्य चार वर्षे चालले. पं.दत्तात्रेयशास्त्री कवीश्वरांच्या समर्थ मार्गदर्शनाखाली संकलनाचे व संपादनाचे कार्य चालले होते. संप्रदायांतील व संप्रदायाच्या बाहेरीलही विद्वान् पंडितांशी संपर्क साधून त्यांच्याकडून महाराजांच्या ग्रंथांना प्रस्तावना लिहिणे, त्यांची भाषांतरे व समीक्षणे करणे इत्यादि पं.कवीश्वरशास्त्री (पुढे प.पू.दत्तमहाराज म्हणून ओळखले गेलेले) यांनी केले. भाविक भक्तांनी, सांप्रदायिकांनी आणि अनुग्रहीत शिष्यांनी आर्थिक साह्य केले. एकूण बारा खंडांत प्रकाशित झालेले हे साहित्य `.५१/- इतक्या अल्प किंमतीत उपलब्ध करून देण्यांत आल्या. प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वती यांच्या कृपापात्र महाराणी इंदिराबाई होळकर यांनी पुण्यांत श्रीगुरुमहाराजांच्या घरी येऊन `३०००|– देणगी दिली.

१९५४ साली प.प.श्रीथोरले महाराज यांची शंभरावी जयंति हैद्राबाद येथे साजरी झाली. ह्याच शुभ पर्वणींत ह्या बारा खंडांच्या ग्रंथप्रकाशनकार्याचे समापन झाले. त्याचबरोबर पं.दत्तात्रेयशास्त्री कवीश्वर यांनी लिहिलेले श्रीस्वामीमहाराजांचे चरित्र **"श्रीगुरुदेवचरित्र"**.ही प्रसिद्ध झाले.

## जिह्वाळ्याची माणसे गेली.

१९५२च्या नोव्हंबरमध्ये श्रीगुरुमहाराजांचे ज्येष्ठ बंधू **श्रीशंकरानंद स्वामी** हे नरसोबावाडीला समाधिस्थ झाले. त्या वेळी दत्तजयंतीला

हैद्राबादला जाण्याचे रहित करून महाराज वाडीला गेले. तेथे श्रीशंरानंदस्वामींची आराधना यथासांग केली. वडील आणि आई यांच्यानंतर हेच महाराजांना घरचे वडीलधारे होते. यांचे सर्व आयुष्य निष्ठापूर्वक धर्माचरण, दत्तोपासना आणि श्रीगुरूपदिष्ट साधन यांच्यांतच व्यतीत झाले. त्याच्यामागे त्यांचा एक मुलगा होता.

तीन-चार महिन्यांतच वाडीलाच देवसवा करीत राहिलेल्या महाराजांच्या कनिष्ठ भगिनी गोदूताई यांचेही अल्पशा आजाराने निधन झाले. महाराज शेवटी चार-पांच दिवस त्यांच्याजवळ होते. अंतकाळ जवल आल्याची चिह्ने पाहून महाराजानी ब्राह्मणांचे तीर्थ व गंगा बहिणीला देऊन गीतेचा पाठही सुरूं केला. महाराजांना हा वियोग बराच जिह्वारी लागला. गोदूताईमुळे, ‘आईनंतर मी एकटा आहे असे वाटले नाही,’ असे त्यांनी पत्रांत लिहिले आहे. त्या वेळी त्यांच्यावर कौटुंबिक जबाबदारी काय ती गोदूताईंचीच होती. तोही पाश आतां दैवयोगाने दूर झाला. गोदूताईंचे सर्व और्ध्वदेहिक क्रियाकर्म महाराजांनी यथासांग केले हे सांगण्याची आवश्यकता नाही.

## स्वामींनी मृत्यू परतविला.

१९५३ च्या मे महिन्यांत आपल्या देहपाताचा योग असल्याचे सद्गुरु श्रीलोकनाथतीर्थस्वामींना जाणवले. त्यासाठई त्यांनी आपल्या निकटच्या कांही शिष्यांना बोलावूनही घेतले. त्याप्रमाणे अमावास्येच्या रात्री दहानंतर स्वामिश्रींची प्रकृती एकदम अस्वस्थ झाली व सर्व गंभीर झाले. स्वामींच्या मुखावर मात्र शांत स्मित विलसत होते आणि नारायणमानाचा मंद उच्चार चालूं होता. इतक्यांत स्वामींचे डोळे विस्फारले गेले व लगेच घट्ट मिटले गेले. शेजारीच बसलेल्या वामनरावांचा (गुरुमहाराजांचा) हात त्यांनी घट्ट धरून ठेवला होता. स्वांमींचा देह थरथर कांपूं लागला. सगळेजण आतुरतेने पहात होते. स्वामी निश्चेष्ट झाले. सर्वांनी आशा सोडलीच. पण तेवढ्यांत त्यांनी डोळे उघडले. त्यांच्या ओठांची हालचाल पाहून महाराजांनी आपले काल जवळ नेले, स्वामी म्हणाले, “वामन! वे चले गये.”.गंडांतर टळले होते.

# श्रीलोकनाथतीर्थस्वामींची महासमाधि.

यानंतर साधारण नऊ महिन्यांनी दि. ९ फेब्रुवारी, १९५४ बुधवारी मध्यारात्रीच्या सुमारास सद्गुरु लोकनाथतीर्थ स्वामी महाराज अत्यंत क्षीण अवस्थेतही शिष्यांच्या मदतीने उठून सिद्धासनावर बसले. गंगाजळ घेऊन भस्मलेपन करविले. रुद्राक्षमाळा धारण केली आणि सर्वांना खोलीबाहेर पाठविले. त्यांनी केलेला ॐकार दोन वेळां बाहेर ऐकायला आला. तिसरा प्रणव बहुधा अंतरांतच विलीन झाला. अर्ध्या तासाने शिष्यवर्गाने खोलीत प्रवेश केला तेव्हां स्वामीमहाराजांचा देह अचेतन होता. ह्या वेळी मात्र श्रीगुरुमहाराज जवळ नव्हते. स्वामींनी त्या दिवशी वेळोवेळां त्यांची आठवण काढली होती. काशीहून स्वामींच्या महासमाधीची तार आली तेव्हां श्रीगुरुचरित्राचा सप्ताह पूर्ण करून महाराज अवतरणिका वाचीत होते. त्या काळांत क्रियाकर्मासाठी काशीला जाणेही शक्य नव्हते. २२फेब्रुवारीला महाराजांनी विधिवत श्रीस्वामीमहाराजांची आराधना केली.

# भैमरथी शांति आणि अमृतमहोत्सव.

१९५६ साली श्रीगुरुमहाराजांना सत्तर वर्षे पूर्ण झाली. त्या निमित्ताने वाडीला गुरुद्वादशीची पर्वणी साधून पं.दत्तमहाराजांच्या पुढाकाराने महाराजांचे शिष्य, भक्त आणि अनुयायी यांनी देवाला चार दिवस महापूजा, पवमान अभिषेक, भैमरथी शांति, पवमान स्वाहाकार आणि रुद्रभिषेक अशी अनुष्ठाने संपन्न केला. त्याच वेळी वाडीच्या पुजाऱ्यांनीही पं.नारायणशास्त्री जेरे (पं.आत्मारामशास्त्रींचे पिताजी) यांच्या अध्यक्षतेखाली महाराजांचा सन्मनपत्र व महावस्त्र अर्पण करून सत्कार केला. पुढे १९५७ च्या मे महिन्यांत त्यांच्या सर्व भक्तांनी हा अमृतमहोत्सवाचा सात दिवसांचा सोहळा, महाराजांच्या अनिच्छेवर मात करून, उत्स्फूर्तपणे पुण्यांत साजरा केला. म.म. दत्तो वामन पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली पं.श्री.द.सातावळेकर, साहित्याचार्य पं.बाळशास्त्री हरदास, ह.भ.प. सोनोपंत दांडेकर इत्यादि श्रेष्ठींनी हजेरी लावली. ह्या सोहळ्याने महाराजांने मोठएपण

पुण्यांतील व महाराष्ट्रांतील लोकांना प्रकर्षाने जाणवले. भैमरथी शांति आणि इतर होमहवनादि अनुष्ठानेही संपन्न झाली..

**१९५७** च्या जून महिन्यांत पं.दत्तमहाराज कवीश्वर यांची कन्या शोभा हिचा इन्फ्लुएंझाने मृत्यू झाला. त्यांच्या घरची मंडळी तापाने पडूनच होती. अशा स्थितीत तिला रुग्णालयांत नेण्यापासून तिच्या और्ध्वदैहकापर्यंत सर्ल गोष्टींची जबाबदारी महारजांनी घेतली. यानंतर महाराजा सोलापूरला गेले. वैद्य मास्तरांनी वर्षापूर्वी अशी इच्छा प्रकट केली होती की त्यांचा मृत्यू महाराजांचे दर्शन घेत असतां व्हांवा. त्याप्रमाणे श्रावण महिन्यातील महारजांच्या सोलापूर मुक्कामांत सकाळच्या वेळी महाराजांकडे पहात आसनावर बसून प्रणवाचा उच्चार करूत त्यांनी देह सोडला. पांचसहा मंडळींसमक्ष घडलेली ही सत्य घटना आहे.

**दुर्धर व्याधी** - यानंतर थोड्याच दिवसांनी श्रीगुरुमहाराजांचीच प्रकृति एकदम बिघडली. प्रॅास्टेट ग्रंथीच्या विकाराने मूत्रावरोध होऊन महाराज बेशुद्ध झाले. रात्रभर अत्यवस्थच होते. सकाळी जरा आराम पडला. महाराजांनी सर्वांना धीर दिला व आपल्याला श्रीथोरले स्वामीमहाराजांचा दृष्टांत झाला असून आपण इतक्यात मरत नाही अशी सर्वांना ग्वाही दिली. मात्र ह्या दुर्धर व्याधीला शस्त्रक्रियेवांचून उपाय नाही असे डॉक्टरांचे मत पडले. ते महाराजांना मान्य नव्हते. त्यामुळे त्यानी पुढे आयुष्यभर ह्या व्याधीला झुंज दिली. सतरा-अठरा वर्षे कॅथेटर वापरून हा भोग अनाक्रोश आणि अप्रतीकारपूर्वक भोगला.. ह्या एकाच गोष्टीवरून महराजांचे निश्चय, तितिक्षा श्रद्धा हे अलौकिक गुण प्रकट होतात. या आजारानंतर महाराजांचे वास्तव्य मुख्यतः पुण्यातच झाले.

**विष्णुपंत चितळे** ह्या विकारावर निसर्गोपचार करण्यासाठी त्या क्षेत्रांतील तज्ज्ञ कॉ.विष्णुपंत चितळे यांची उपाययोजना सुरूं झाली. पुण्यांतील सक्रिय राजकारणांत गाजलेले साम्यवादी चितळे वैयक्तिक जीवनांत एक श्रेष्ठ योगी होते. कॉ.चितळे महाराजांचा अत्यंत आदर करीत. त्यांच्या उपचारांनी महाराजांना हळूंबळूं पण निश्चित आराम पडत गेला. विशेषतः त्यांचा जवळजवळ नगण्य झालेला आहार सुधारला व वर्षाभरांत ते

चांगले हिंडूंफिरूं लागले. १९५८ च्या अखेरीस त्यांनी गुरुद्वादशीची वारी करून प्रवासही सुरूं केला. पुढे  लवकरच काशीयात्रा केली व प्रयागला माघस्नानाची पर्वणीही साधली. मार्च महिन्यांत गिरनारची यात्रा केली चार हजार फूट उंचीवर चढून श्रीदत्तपादुकांचे पूजनही केले. मात्र या सर्व प्रवासाने शरीराला चितळ्यांच्या पथ्यपाण्यांत साहजिकच शिथिलता आली. त्यामुळे पुढे वर्ष-दीड वर्ष प्रवास कमी करून पुन्हा चितळ्यांच्या देखरेखीखाली निसर्गोपचार चालूं झाला.

१९६१ सालचा श्रीसद्गुरु वासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामींचा पुण्यतिथि उत्सव ४५वर्षांच्या रिवाजाप्रमाणे २०, नारायण पेठ इथे साजरा होत होता. उत्सवाचा सहावा दिवस ज्येष्ठ अमावास्या(१२ जुलै)) होता. दुसरे दिवशीच्या महाप्रसादाचे सामान महाराजांच्या खोल्यासमोर एका तात्पुरत्या पत्र्याच्या शेडमध्ये निवडलेले धान्य, चिरलेली भाजी, वळलेले लाडू इत्यादि सर्व सामान ठेवले होते. बापूसाहेब कुबडे इत्यदि बाहेरगांवचे कांही भक्तही आले होते. गुरुचरित्राचा सप्ताहही पूर्ण झाला होता. माध्याह्न पूजा करून देवाला नैवेद्य दाखविला आणि आरतीला आरंभ होतो न होतो तोंच पानशेतच्या धरणफुटीचे पाणी घोगावत वाड्यांत शिरले. देवापुढे तुळशीपत्र ठएवून आरती थआंबवली आणि सगळे जण हातात येईल ते आणि तेवढेच निवडक सामान घेऊन पळत सुटले. तशाही गर्दीत महाराजांनी सौ.माई क्षीरसागर (आजेगांवकरांच्या कन्या) यांच्याकडून नदीची खणानारळाने ओटी भरून घेतली, देवाच्या पादुकांचा करंडा वरच्या कपाटांत ठएवून दिला आणि भिंतीला लावलेले साखळीचे घड्याळ हातांत घेतले आणि सर्वांना बाहेर काढून शेंवटी अंगावरच्या कपड्यानिशी बाहेर पडले. दाराला कुलूप लावून उजव्या बाजूच्या म्हशीच्या गोठ्यांतून ते निघाले. त्यांच्या आरोग्याचे रक्षण करणारे नित्योपयोगी कॅथेटर आठवणीने दुसऱ्याकरवी घेऊनही ते पाण्यांत वाहून गेले. पाण्यापासून बचाव करण्यांतच दिवस गेला आणि रात्री आसऱ्याला पुरंदरे कॉलनीत श्री.गोविंदराव फाटक यांच्याकडे थांबले.

महाराजांनी प्रयत्नांची शर्थ करून छापलेले श्रीथोरल्या स्वामी महाराजांच्या बारा खंडांचे ग्रंथ त्यांच्या घरीच होते. ते सर्व पाण्यांत गेले

होते. त्यापेक्षांही महाराजांच्या मातुःश्रींना मिळालेल्या देवाच्या प्रसादपादुका पाण्यांत गेल्या होत्या. उद्यांच्या पुण्यतिथीचे सामानही जलमग्न झालेले! तरी महाराज शांत होते. सद्गुरुनाथ यांतून कशी वाट काढतात ते पहात होते!

बुधवार पेठेतील सिद्धमातामंदिराचे वे.मू.जगन्नाथ पुजारी यांनी तिथे येऊन श्रीगुरुमहाराजांना दुसरे दिवशींचा पुण्यतिथीचा सर्व कार्यक्रम सिद्धमातामंदिरांत करण्याचा दिलासा देणारा प्रस्ताव मांडला. तिथए जागेची व भोजनाचीही सोय होती. विश्वस्तांचीही अनुकूलता होती. महाराजांकडची सर्व मंडळी आधींच तिथे पोंचली होती. असा हा एक मोठा प्रश्न सुटला तरी पादुकांचा विरह त्यांना सहन होत नव्हता. अखेर रात्री नऊ वाजल्यानंतर पाणी ओसरूं लागले. रस्त्यांतून, घरादारांतून वहात आलेली लांकडे, चिखल, कांटे आणि घरांतून वाहत जाणाऱ्या सर्व वस्तू यांची एकच सरमिसळ झालेली. या सर्वांतून रात्री वाट काढीत घरीं जाणे हेच एक दिव्य होते. त्यांतून पोलीसांचा बंदोबस्त. अखेर या सर्वांवर मात करून नाना भालेरावांनी घरीं जाऊन महराजांनी बाहेर पडतांना खुणेने कपाटात ठेवलेला करंडा महाराजांना आणून दिला. त्या वेळी त्यांनी तो मस्तकी, हृदयी दीर्घ काळ धारण केला तेव्हां त्यांचे डोळे पाण्याने डबडबले होते. त्या प्रणाहून प्रिय पादुका परत मिळाल्याने "आम्हांल सर्व कांही मिळाल्यासारखे आहे", असे उद्गार काढून त्यांनी सर्वांना धन्यवाद दिले. वे.मू.जगन्नाथ पुजारी यांच्या साहयाने आणि प्रयत्नांनी दुसरे दिवशींचा पुण्यतिथीचा कार्यक्रम उत्तम रीत्या पार पडला. योगेश भालेराव यांनी वरच्या मजल्यावर नेऊन ठेवलेले लाडवांचे पातेलेही पाण्यांत तरंगून सुरक्षित राहिले ही एक लक्षणीय घटना आहे.

पुढचे कांही दिवस या विनाशांतून सांवरण्याचे होते. आपद्ग्रस्त पुणेकरांच्या कसोटीचाच तो काळ! या काळांतसुद्धां श्रीगुरुमहाराजांची प्रसन्न शांती पाहून "नित्यं च समचित्तत्वं इष्टानिष्टोपत्तिषु" ह्या गीतावचनाची साक्ष पटत होती. सर्वांना आधार देत, नियोजनपूर्वक, चिकाटीने त्यांनी पुरांतून वांचलेली पुस्तके, चित्रे, पोथ्या, चैलचित्रे इत्यादींची ठाकठिकी केली.

मात्र या घटनेनंतर आपल्या वाढत्या सांप्रदायिक आणि आध्यात्मिक कार्यासाठी, आपल्या भक्तांना आश्रय देणाऱ्या स्वतंत्र जागेची कशी निकड आहे हे श्रीगुरुमहाराजांना तीव्रतेने जाणवले आणि सर्वांनी उचलून धरलेल्या पू.दत्तमहाराजा कवीश्वर यांच्या आश्रमाच्या निर्मितीच्या प्रस्तावास त्यांनी मान्यता दिली.

# श्रीवासुदेवनिवासाची निर्मिती.

ते वर्ष महाराजांनी सिद्धमातामंदिरांतच काढले. त्यांनतर ते पुन्हा गोवईकरांच्या चाळीत रहायला गेले. मधूनमधून महाराजांची व्याधी उफाळून येई. डॉक्टर मंडळींचा ऑपरेशनचा आग्रह होता. पण ते महाराजांना नकोच होते. या काळांत समर्थ संप्रदायाचे संत पू.श्रीधरस्वामी यांचा पुण्यांत मुक्काम झाला. श्रीधरस्वामींचा परिचय श्रीगुरुमहाराजांना श्री प.प.प्रज्ञानानंद(कर्वे) स्वामींकडून झाला होता. १९४७ साली पू.स्वामींचा व महाराजांचाही मुकाम दोन महिने वाडीला असतांना महाराज रोज त्यांच्या दर्शनाला जात. पुढेही त्यांच्या अनेक भेटी झाल्या आहेत. महाराज त्यांचा गुरुतुल्य आदर करीत. त्यांनी या काळांत महाराजांना कुलस्वामिनीच्या उपासनेचा आग्रह केला. त्यावरून महाराजांनी तुळजापूरची वार्षिक यात्रा सुरू केली.

आश्रमाच्या कार्याला लवकरच गति आली. पं.दत्तमहाराज कवीश्वर यांच्या नेतृत्वाखाली, महाराजांचे अनुग्रहीत शिष्य, भक्त इत्यादींनी योगदान केले. सर्वश्री.बाळासाहेब, वाकडे, बगाराम देव, केशवराव जोशी इत्यादि मंडळी कार्यरत होती. मुंबईला श्री.ना.व्यं.भागवत यांनी लोकप्रिय नाटकांच्या प्रयोगांतून पैसे उभारले. श्री.वि.मो.वैद्य हे एजिनीअर यांच्यावर बांधकामाची जबाबदारी होती. श्री.मधुकर सी. अत्रे हे अर्थव्यवस्था पहात होते. महाराजांचेही लक्ष ह्या कामावर बारकाईने होते व मधून मधून ते अत्यंत मौलिक सूचनाही देत होते. महाराजांचे इतर नित्य नैमित्तिक कार्यक्रम चाललेच होते. १९६३ साली महाराज पाडव्यापासून महिनाभर काशीत होते. महाराजांनी काशीत आपले कुलगुरु श्रीनारायणस्वामी यांच्या पुण्यतिथीचा उत्सव धार्मिक अनुष्ठाने, मंत्रजागर, प्रवचने दानधर्म इत्यादींनी थाटाने

साजरा केला. अन्नपूर्णेचे रोज कुंकुमार्चन केले, त्या काळांत पुण्यात गु.भ.नाना भालेराव यांना देवीने स्वप्नांत येऊन "हळदीकुंकू अंगावर फार झाले" असे सांगितले. दुसरे दिवशी पूजेचे वेळी पाहिले तर खरोखरच देवीच्या वस्त्रांवर आणि आंतही खूपसे कुंकू आढळले. ते व्यवस्थित झाडून पुसून पूजा केली. पुढंही कांही दिवस रोज हाच अनुभव येत होता. ही प्रासादिक प्रचीती त्यांनी पत्राद्वारे गुरुमहाराजांना कळविली.

१९६४ मध्ये आश्रमांचे बाधकाम पूर्णावस्थेला आले. १९६५ च्या पौष वद्य दशमीला आश्रमाची वास्तुशांति थाटामाटाने संपन्न होऊन तो श्रीगुरुमहाराजांना समारंभपूर्वक अर्पण करण्यांत आला. यथाविधि वास्तुशांति होऊन इतरही बरीच धार्मिक अनुष्ठाने संपन्न झाली. महाराजांनी लगेच आश्रमाचे विश्वस्तपत्र करून व एक विश्वस्तमंडळ नेमून सर्व कारभार त्यांच्या हाती दिला. ह्या न्यासाचे नांव "प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वती आणि प.प.श्रीलोकनाथतीर्थ स्मारक न्यास" असे ठेवले. त्या दिवसापासून आश्रमांत धार्मिक अनुष्ठानांची सुरू झालेली परंपरा अखँडपणे चालूं आहे. याच काळांत लोकनायक बापूजी अणे आणि ह.भ.प. सोनोपंत (मामा) दांडेकर आश्रमात येऊन गेले. आश्रमाला भगवान श्रीधरस्वामींची भेटही तीनचार महिन्यांतच आली.

आश्रमांत वास्तव्य करायला आल्यापासून गुरुमहाराजांना बऱ्याच दिवसांत प.प.श्री थोरले स्वामी महाराज यांचे स्वप्नांत दर्शन झाले नाही. त्यामुळे ते अस्वस्थ झाले. आपण आश्रमांत येऊन राहण्यांत कांही चुकत तर नाही अशीही शंका त्यांच्या मनांत आली. पण लगेचच त्यांना श्रीसद्गुरु स्वामी महाराज आश्रमांत हौदावर बसून प्रसन्नपणे हंसत असल्याचे दर्शन झाल्याने ते सुखावले. यानंतर वर्षाभरांतच दुसरी एक श्रीस्वामी महाराजांच्या कृपावात्सल्याची द्योतक अशी एक घटना घडली.

औरवाड येथे श्रीदत्त-अमरेश्वर मंदिरांत प.प.श्रीनृसिंहसरस्वती (दीक्षित) स्वामी महाराजांना प्रत्यक्ष श्रीस्वामीमहाराजांकडून प्राप्त झालेल्या त्यांनी स्थापन करून तिथे "प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वती पीठ" निर्माण केले आहे. श्रीगुरुमहाराजा आश्रमांत वास्तव्य करायला आल्यानंतरच्या कांही

महिन्यातच तेथील एका सेवेकऱ्याने त्या पादुकाच चोरल्या व तो नाहीसा झाला. त्याचा शोध कांही लागला नाही. पुढे प.पू.दत्तमहाराजांना स्वप्न पडले की तो सेवेकरी त्या पादुकांचे गांठोडे घेऊन श्रीवासुदेवनिवासांत येऊन बसला आहे. २-३ दिवसांतच पू.दत्तमहाराजांना तो सेवेकरी आश्रमांत येऊन बसलेला दिसला. त्यांनी तात्काळ त्याला ओळखून त्या पादुका हस्तगत केल्या आणि माडीवर जाऊन श्रीगुरुमहाराजांपुढे ठेवल्या. अत्यंत आनंदाने महाराजांनी आणि सर्व आश्रमवासीयांनी त्या पादुकांचे दर्शन घेतले. त्या वेळी महाराजांनी आपल्या मनांतली अनेक दिवसांची ही इच्छा सद्‌गुरुमहाराजांनी पूर्ण केली असे सांगितले. प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वतीच आपल्या शिष्योत्तमाच्या आश्रमांत आले असेच सर्वांना वाटले. त्या पादुका चार महिने आश्रमांत ठेवून त्यांची पूजा केली आणि मग त्या सन्मानपूर्वक परत औरवाडला पाठविल्या. त्या वर्षांपासून प.पू.दत्तमहाराजांनी आपला दरवर्षीचा प्रौष्ठपदी भागवतसप्ताह औरवाडच्या ऐवजी पुण्यांतील वासुदेवनिवासांत करायला सुरुवात केली. ही घटना म्हणजे प.प.श्री थोरल्या स्वामी महाराजांनी आपला या वास्तूंत नित्य वास राहणार असल्याची निःसंशय ग्वाही आहे.

अशा रीतीने एका नवीन महायोगपीठाची स्थापना झाली. श्रीगुरुमहाराजांनी प्रवर्तित केलेल्या कुंडलिनी शक्तिपातयोगाचे शाश्वत केंद्र अस्तित्वांत आले. सनातन वैदिक धर्माच्या जिवंत परंपरा जतन करणारे संस्थान उभे राहिले. अनेक पिढ्यांतील जिज्ञासु, साधक, भक्त, योगी, धर्मानुयायी यांना एक समर्थ आश्रय निर्माण झाला. पं.आत्मारामशास्त्री जेरे यांच्या म्हणण्याप्रमाणे, “हा आश्रम म्हणजे प्रत्यक्ष स्वर्ग आहे. स्वर्गीय आनंदाचे वातावरण आश्रमांत अखंड आहे. येथे उणीव कशाचीच नाही. मानवी बुद्धि आश्रमांत येतांच नाहीशी होते आणि ईश्वरी गुणांचा संचार येथे प्रत्येकाच्या हृदयांत होतो. हा दत्तदरबार आहे.” पंडितजींच्या मुखांतून प्रकटलेले हे गुह्य जाणून आश्रमांत येणाऱ्या प्रत्येक भक्ताने या वास्तूंतल्या ईश्वरी अस्तित्वाची जाणीव ठएवून वागले पाहिजे.

# सहस्रचंद्रदर्शनशांति.

श्रीगुरुमहाराजांच्या सहस्रचंद्रदर्शन शांतीचा सोहळा १९६७च्या चैत्र वद्य द्वितीया ते चै.व. सप्तमी (२६-४ ते ३०-४) असा पांच दिवस साजरा करण्यांत आला. त्यापूर्वी चार महिने श्रीगुरुमहाराजांनी श्रीदत्तमालामंत्राचे अनुष्ठान केले. अनुष्ठानकाळांत, मौनादि नियम केले होते. दाढी-जटा वाढविल्या होत्या. कुणाचाही स्पर्श नव्हता. या समारंभाचे अध्यक्षस्थान प.प. श्रीलोकनाथतीर्थस्वामीमहाराजांचे गुरुबंधु प.प.श्री१०८श्रीविष्णुतीर्थ स्वामी महाराजांनी भूषित केले होते. श्रीगणेशयाग, चंडी, श्रीदत्तयाग, सौरयाग, पवमान आणि रुद्र स्वाहाकार इत्यादि धार्मिक अनुष्ठानांसह शांतीचे कर्म संपन्न झाले. मुख्य समारंभाच्या पूर्वी प.पू.श्रीगुरुमहाराजांची व प.प.श्रीविष्णुतीर्थस्वामीमहाराजांसह हत्तीवरून मिरवणूक निघाली. सत्कारसमारंभाच्या वेळचा एक हृद्य प्रसंग म्हणजे पं. श्री.दा.सातवळेकर यांची भेट. त्याच दिवशी त्याच वेळेस पंडितजींचा शताब्दिपूर्तीचा सत्कारसमारंभ पुण्यातंच आयोजित केलेला होता. कटाक्षाने वेळ पाळणारे पंडितजी, आपल्या सत्कारसमारंभाला उशीर करून, श्रीगुरुमहाराजांच्या दर्शनासाठी येऊन गेले. गुरुमहाराजांनी त्यांचे उत्थापनाने स्वागत केले आणि पुढे जाऊन त्यांना नमस्कार न करूं देतां आपणच त्यांना वंदन केले. पंडितजींनी आपल्या छोट्याशा भाषणांत आपल्या सद्गुरूंना वयोमर्यादेमुळे आपल्याला वंदन करतां येत नाही याबद्दल खंत व्यक्त केली आणि आपल्या सद्गुरूंना शाब्दिक वंदन केले. श्रीविष्णुतीर्थस्वामींचे अधिकारी वाणीने केलेले विद्वत्तापूर्ण भाषण, श्रीगुरुमहाराजांचे भावपूर्ण मनोगत आणि विश्वस्तांनी अभिवादनपूर्वक सादर केलेले भावी कार्याचे संकल्प ही या समारंभाची ठळक वैशिष्ट्ये होती.

# श्रीगुरुमहाराजांची दिनचर्या.

श्रीगुरुमहाराजांची दैनंदिनी आदर्शच होती. पहांटे पांचपूर्वी त्यांचा दिवस सुरूं होई. तोंड धुवून आल्यावर पाटावर बसून श्रीस्वामी महाराजांनी सांगितलेला अजपा जपाचा संकल्प करीत असत. त्यानंतर साधनेला बसत.

यावेळी त्यांच्यासमोर बैठकीसाठी बाहरगांवचे व पुण्याचेही साधक येत असत. महाराज आत आपल्या झोंपण्याच्या खोलीत बसत तर इतर साधक मंडळी त्यांच्यासमोर किंवा बाहेरही बसत असत. तास-दीड तास ही बैठक चाले. या वेळी साधकाच्या आवश्यकतेप्रमाणे त्यांच्या साधनेच्या प्रगतीसाठी महाराज त्या त्या चक्रांना स्पर्श करीत असत. बहुतेक साधकांना अशा बैठकीनंतर साधनांत प्रगतीची अनुभूती येत असे.

साधनेनंतर वृत्तपत्रांचे वाचन होई. बहुतेक सेवेकऱ्यांच्याकडून वाचून घेत. वाचन समावेशक आणि विचक्षणपणे होई. नंतर घैसास गुरुजी हे नियमित मालिश करायला येत. यानंतर स्नानाला जात. त्या वेळी आश्रमांतून व बागेतून एक फेरी टाकत. यानंतर सकाळचे आह्निक होत असे. १२०० गायत्र जपासह संध्या, सद्‌गुरूंचे पूजन, द्‌विसाहस्री गुरुचरित्राचे वाचन, विष्णुसहस्रनाम, ऐतरेय उपनिषदाचा पाठ, श्रीगुरुप्रदत्त मंत्राचा जप झाल्यावर मातुःश्रींना प्राप्त झालेल्या पादुकांवर पाणी घालून ते तीर्थ मस्तकी आणि मुखांत धारण करीत. सवडीने एकादे रुद्राचे आवर्तन अभिषेकाच्या वेळी म्हणत. आह्निक संपूर्ण झाल्यावर देवाला गंधफूल वाहून साष्टांग नमस्कार घालीत. त्यानंतर औदुंबराला पाणी घालून, प्रदक्षिणा, फुले आणि तुलसी समर्पण करून नमस्कार करीत. मग ब्रह्मयज्ञ आणि वैश्वदेव होई.

११-११।।ला जेवणाची वेळ होत असे. बाहेरगांवची व पुण्याची मिळून दहा-बारा मंडळी पंक्तीला असत. भोजन नित्य सोंवळ्यांतच होत असे.
दुपरी तीन नंतर भक्तांची वर्दळ सुरू होई ती संध्याकाळपर्यंत. आधि आणि व्याधींनी आर्त झालेल्यांची सहानुभूतीने विचारपूस करून त्यांच्या आर्तीच्या परिहारासाठी मार्गदर्शन ते करीत. यासाठी व सकाम भक्तांसाठी श्रीगुरुमहाराज प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराजांच्या प्रश्नावलीचा उपयोग करीत. लोकांना त्याचे उत्तम अनुभवही येत असत. पण त्या सर्वांचे श्रेय ते प्रश्नावलीतील उपासनांना आणि प.प.सद्‌गुरु टेंबे स्वामी यांच्या संकल्पाला देत असत. त्यांच्या केवळ दर्शनानेसुद्धां आर्तांचे दुःख शीतल होत असे. कुणी कांही विषय काढल्यास उद्‌बोधक चर्चाही होत असत.

संध्याकाळी सहाला फिरायला जाण्याचा नियम होता. बरोबर ठराविक मंडळी असत. कधी कुणी भाग्यवंत प्रसंगाने त्यांच्यांत सामील होत. फिरून आल्यावर सायंसंध्या करीत असत. ही वरच्या मजल्यावरच करीत. संध्या झाल्यावर उपाहार होई. दूध, भाजलेले शंगदाणे (यांना महाराज 'गरीब माणसाचे काजू' म्हणत) किंवा फळे यांचा त्यांत समावेश असे. यानंतर ते पलंगावर बसून आलेल्या साधकभक्तांशी गप्पागोष्टी करीत असत. रात्री दहाच्या सुमारास हा 'दत्तदरबार' विसर्जित होई. त्यानंतर श्रीगुरुमहाराज हात-पाय धुवून, पाटावर बसून आचमनपूर्वक दिवसभरांची कर्मे ईश्वराला समर्पण करीत. त्यानंतर आपल्या शयनकक्षांत जाऊन महाराज झोपत असत.

## रौद्रीशांति समारोह.

श्रीगुरुमहाराजांच्या वयाला ८५ वर्षे पूर्ण झाल्याच्या निमित्ताने पू.दत्तमहाराज कवीश्वर यांच्या पुढाकाराने रौद्री शांतीचे आयोजन करण्यांत आले. २६ मे ते १ जून, १९७१ असा आठवडाभर हा कार्यक्रम भव्य स्वरूपांत साजरा झाला. रौद्री शांतीशिवायही श्रीगणेशयाग, ऋक्संहिता स्वाहाकार, लघुरुद्रस्वाहाकार, शतचंडी याग झाले. श्रीदत्तमालामंत्र आणि मृत्युंजयमंत्र यांची सामूहिक अनुष्ठाने झाली. सर्व भारतांतून भक्तमंडळींनी आर्थिक साह्य केले. अहमदाबादहून तुपाचे डबे, सैंधव्याहून तिळाची पोती, गंगापूर साखर कारखान्यतून अकरा पोती साखर व दोन पोती शंगदाणे, साबळे शेटजींनी दहा पोती तांदूळ इत्यादि स्वरूपांतही बरेच योगदान भक्तांनी उत्स्फूर्तपणे केले. परगांवचे १२०० भक्त निवासांत आलेले होते. बरीच मंडळी इतरत्रही नातेवाइकांकडे आलेली होती. दुपारच्या वेळी भजन, कीर्तन, प्रवचन इत्यादि कार्यक्रम होत असत. पं.आत्मारामशास्त्री जेरे यांनी समारंभाचे अध्यक्षस्थान स्वीकारले होते. प.पू.ह.भ.प.धुंडामडामहाराज देगलूरकर हे विशेष आमंत्रित होते. देशभरांतून अनेक विद्वान पंडितांना आमंत्रित केले गेले. या प्रसंगी प.पू. श्रीगुरुमहाराजांची रौप्यतुला करण्यांत आली. यासाठी अनेक भक्तांनी आपल्या घरांतील चांदीची भांडी वगैरे वस्तूंचे दान केले होते.

हा सोहळा अत्यंत दर्शनीय झाला आणि हजारों भक्तांच्या डोळ्यांचे पारणे फेडून गेला. रौप्यतुलेच्या चांदीचे यथोक्त दान केलेच. नंतर उरलेल्या चांदीचा विनियोग श्रीनरसोबावाडीच्या दारांना मढविण्यात करण्यांत आला. रौप्यतुलेच्या अनुलक्षाने मोठ्या प्रमाणांत दानधर्म करण्यांत आला. आमंत्रित विद्वानांना, वैदिक मंडळींना, कार्यकर्त्यांना, वस्त्रे व दक्षिणा (१०१रु.) दिली. आमंत्रितांपैकी जे समारंभाला येऊ शकले नाहीत त्यांनाही दक्षिणा पाठविण्यात आली. या सप्ताहात साधारण पंधरा हजारांपर्यंत अन्नदान झाले.

# वाडीचा सभामंडप.

श्रीगुरुमहाराजांचे संपूर्ण जीवन श्रीक्षेत्रनृसिंहवाडी (नरसोबावाडी) या केंद्राशी निगडित आहे. मातापित्यांची उपासना, पादुकांचा प्रसाद, उमामातांची दिव्य अनभूती, सद्गुरूंचे प्रथम दर्शन इत्यादि घटना तर या वाडीच्या नरसोबाच्या कृपेचा आविष्कार आहेतच; पण स्वतः श्रीगुरुमहाराजांची उपासनेचे केंद्रही वाडीच होते. त्यांच्या मनांत या क्षेत्राविषयी असलेल्या नितांत भक्तिभावाची कल्पनाही करणे अशक्य आहे. ह्या नदीच्या पात्रांतच ह्या पादुकांची स्थापना श्रीदत्तात्रेयस्वरूप श्रीमन्नृसिंहसरस्वती स्वामी महाराजांची केलेली आहे. त्यांच्या आज्ञेनुसार वाडीच्या पुजाऱ्यांजे पूर्वज बहिरंभट यांनी आजीवन करून ते महाव्रत आपल्या पुत्रांकडे सोपविले. सुरुवातीला ह्या पादुका मोकळ्या जागेवरच होत्या. बहिरंभटाचे ज्येष्ठ पुत्र श्रीपादभटजी आणि त्यांच्या मुलांनी पुढे पादुकांचे पाषाणाचे मंदिर बांधले. ११९२ साली विजापूरच्या बादशहाने दत्तप्रभूंच्या कृपेने आपल्या कन्येचे अंधत्व निवारण झाल्याने बाहेरचा आयताकृती मंडप बांधला. त्यानंतर सोळाव्या शतकांत पैठणचे महान संत एकनाथ महाराजांनी देवासमोरचा घाट बांधला. त्यानंतर सुमारे चारशे वर्षे ह्या देवस्थानावर कांहीच बांधकाम झाले नव्हते. कुणी क्वचित् तसा विचार केला तरी देवाची आज्ञा मिळाली नाही. श्रीगुरुमहाराजांच्या मनांत अशी तळमळ उत्पन्न झाली की देवाची पालखी रोज उघड्यावरूनच जाते. देवाला आणि भक्तांनाही उनापावसापासून कसलेच संरक्षण नसते. तेव्हां ह्या प्रदक्षिणामार्गावर एक मंडप उभारला जावा. ह्या

त्यांच्या संकल्पाला मात्र समष्टीचे अनुमोदन मिळाले असे दिसते. त्यांनी आपल्या शिष्यांसमोर हा विषय मांडला आणि स्वतःजवळचे पस्तीस हजार रुपये देऊं केले. लगेच शिष्यमंडळीनीही याथशक्ति द्रव्यसाह्य केले. कांही शासकीय अनुदानही मिळाले. अल्प काळांतच संकल्पित निधि जमल्याने निधिसंकलन एका वर्षाच्या आंतच थांबवावे लागले. देवस्थानाच्या विश्वस्तांकडून आवश्यक ते अधिकारपत्र घेऊन प्रत्यक्ष कामाची जबाबदारी आश्रमाचे बांधकाम केलेले श्रीगुरुमहाराजांचे निष्ठावान एंजिनीयर शिष्य गु.भ. वि.मो.वैद्य यांच्यावर सोंपविली. त्यांनी दीड वर्षापेक्षा अधिक काळ वाडीलाच राहून ते काम अतिशय उत्तम रीतीने पार पाडले. ८-२-१९७३ रोजी हे काम पूर्ण होऊन वास्तुशांति संपन्न झाली. मंदिराभोवती भव्य आणि सर्वांगसुदंर असा प्रदक्षिणामंडप तर झालाच पण, ओंवऱ्यांचे नूतनीकरण, श्रीनरायणस्वामींच्या मंदिरांतील "स्वारी" (उत्सवमूर्ती) पूर्वाभिमुख करणे, कट्ट्यावरील राममंदिराचा जीर्णोद्धार, श्रीउमामातांना झालेल्या श्रीदत्तदर्शनाच्या जागेवर वृंदावन, स्वतंत्र धर्मशाळा इत्यादि कामेही त्या अनुषंगाने झाली. श्रीगुरुमहाराजांनी आपल्या श्रीगुरुद्वादशीच्या वाडीच्या अंतिम वारीत (२३ ऑक्टोबर,१९७३) सर्व शिल्प देवस्थानाला अर्पण करून साठ हजारांहून अधिक निधि डागडुजीसाठी गंगाजळी म्हणून दिली.

## महानिर्वाण.

आश्रमांतील गर्दी आतां खूप वाढूं लागली. आर्त, अर्थार्थी, जिज्ञासू यांची सतत रीघच लागली होती. मधून-मधून ज्ञानी सत्पुरुषांच्या भेटी होत होत्या. विविध धार्मिक कार्यक्रम संपन्न होत होते. नित्य येणाऱ्या पत्रांची संख्याही ५००हून अधिक होती. या काळांत नवीन दीक्षांची संख्या दरमहा ५०-६० तरी होत असे. खूपशी पत्रे आर्त भक्तांची असत. त्यांना प्रश्नावलीत पाहून पत्राने उपाय कळविले जात. शरीराचे वार्धक्य आणि पुरःसर व्याधींना तोंड देत श्रीगुरुमहाराज या सर्वांचीच अंतरें राखण्यांत तत्पर होते. या सर्व अव्याहत चालूं असलेल्या त्यांच्या कार्याचा विस्ताराने परामर्ष इथे घेणे अशक्य आहे. विशेषतः रौद्रीशांतीच्या काळानंतर ही भक्तांची गर्दी अधिकच वाढली. ह्या सर्वांचे समाधान करणे हे स्वतःच्या प्रकृतीचीही पर्वा न करतां

एखाद्या व्रताप्रमाणे श्रीगुरुमहाराज करीत होते. ‘ढोर महार चांभार। भेटेल जो जो नर। तय़ाचे राखावे अंतर। या नांव भजन।।’ या श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या उक्ताचे प्रत्यंतर त्यांच्या जीवनांत दिसून येते. या काळांत श्रीगुरुमहाराजांनी दीक्षेसाठी आलेल्या प्रत्येक साधकाला दीक्षा दिली. त्यांच्या शरीराला हा ताण बऱ्याच वेळां झेपतही नसे. मग डॉक्टर आणि नजीकची मंडळी त्यांना फार न बोलायची विनंतीही करीत. ह्यावर ते श्रीरामकृष्ण परमहंसांचा आदर्श दाखवीत. “माझ्या बोलण्याने एकाचेही कल्याण झाले तरी मला समाधान वाटणार आहे. या देहाचे काय वाटेल ते झाले तरी चालेल.” हे त्यांचे वचन ते सांगत. एकदां अशाच आग्रहाला उत्तर देतांना महाराज म्हणाले, “जे माझ्यावर एवढे प्रेम करतात, मला भेटायला लांबलांबून येतात, त्यांच्याशी बोलण्याची बंदी म्हणजे शिक्षाच की ही! त्यांच्याशी मी बोललो नाही, त्यांना भेटलो नाही तर माझी प्रकृती ठीक कशी राहील?”

एकवीस वषे अंगावर काढलेला आजार हळूंहळूं बळावत गेला. १९७३च्या श्रावण महिन्यांतली तुळजापूरची वार्षिक यात्रा रहित झाली. महाराजांनी आपल्या प्रेमांतल्या लोकांच्या भेटी घेतल्या. त्यांना आश्रमांत ठेवून घेऊन त्यांना सहवास दिला. त्याचबरोबर ते सर्व भक्तांना आपल्या भक्तांना प्रत्यक्ष, स्वप्नदृष्टांतांत, साधनांतून आपल्या अवतारसमाप्तीचे संकेत देऊं लागले. अगदी श्रीगुरुमहाराजांच्या निर्याणाच्या दिवसापर्यंत हे संकेत मिळत राहिलेले दिसतात. बऱ्याच शिष्य-भक्तांना पुण्याला येण्याच्या प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष सूचनाही मिळालेल्या आहेत. अशाही अवस्थेवर मात करून श्रीगुरुमहाराज गुरुद्वादशीला वाडीला गेले व तिथे नदीचा घाट चढून उतरून सर्व कार्यक्रम यथास्थित पार पाडले हा एक चमत्कारच होय.

दहा जानेवारी पहांटे आश्रमांतील साधकांना उद्देशून जीवनाच्या कृतार्थतेची चतुःसूत्री सांगितली.

१. शुद्धान्न सेवन

२. नियमित साधना.

३. परंपरेच्या सर्वंकष सामर्थ्यावर दृढ श्रद्धा.

४. आपण कोण? ही विशुद्ध भावना.

"व्रतवैकल्ये, अनुष्ठाने होतील तेवढी करावीत, परंतु न घडली तरी खिन्न होऊं नये. सर्वांनी सदाचाराने मात्र वागावे. निर्मळ अंतःकरण, सदाचार याने ईश्वराला संतोष होतो. ईश्वर आहे या भावनेने वागलांत तरी पुरेसे आहे."

रविवार दि. १३ जानेवारी रोजी महाराजांची खूपच अस्वस्थ झाली. त्यांना उपचारासाठी रुग्णालयांत हलविण्याची सूचनाही डॉक्टरांनी केली. पण याविषयी महाराजांनी स्पष्ट सूचनी दिल्या होत्या व सर्व उचार वासुदेवनिवासांतच करण्यांत आले. अनेक नामवंत डॉक्टरांनी नियमितपणे भेटी देऊन त्यांचे उपचार उत्तमपणे केले. मधऊनमधून महाराजांनी "उत्तरायण केव्हां लागते?" असे विचारले. पण त्यांतील गर्भितार्थ कुणाच्या फारसा लक्षांत आला नाही. सोमवारी मकरसंक्रांतीचा दिवस होता. भक्तमंडळी तिळगूळ देण्यासाठी आश्रमांत येत होती व खालीच देवापाशी तिळगुळाचा प्रसाद घेऊन जात होती. तशाही अवस्थेत कांही विशेष मंडळींना महाराज बोलावून घेत व थोडाफार वेळ जवळ बसवूनही घेत. सोमवारी रात्री १० वाजतां भस्म धारण करून गंगाजलाने मार्जन करून संध्या केली. संध्या केली. रात्रीतून प्रकृतीत सुधारणा वाटली आणि सकाळी मंगळवार दि. १५ जानेवारीला उठून महाराजांनी अजपा जपाचा संक्लपही नित्याप्रमाणे केला. महाराजांची प्रकृती सुधारल्यासारखी दिसली. आश्रमांतल्या वातावरणाचा ताणतणाव खूपच कमी झाला. सर्व आश्रमवासीयांना महाराजांनी आह्निक-पूजा लवकर आवरून जेवण करून घेण्यास सांगितले. दुपारी साडेबारानंतर डॉ.सानो यांनी येऊन हाताला लावलेली सुई कढल्यावर श्रीगुरुमहाराजा अंगावरचे कपडे काढून उठून कुणाचाही आधार न घेतां स्नानाला गेले. तिथेच त्यांना हृदयविकाराचा झटका आला. त्यांना उचलून गादीवर आणून ठेवले. त्यानंतर त्यांनी गंगाजळ घेतले आणि त्या परमपवित्र देहाचा त्याग केला.

# कृपेची साउली.

वयाच्या ४०व्या वर्षी श्रीगुरुमहाराज पुण्यांत आले त्या वेळीच त्यांची स्थिति "आतां उरलो उपकारापुरता" अशी होती. त्यांच्या लोकसंग्रह कार्याचा आरंभ बार्शीलाच झाला होता तरीही त्यांचे प्रमुख कार्यक्षेत्र पुणेच होते. आपले मोठेपण त्यांनी जसे प्रकट केले नाही तसेच ते चोरूनही ठेवले नाही. **"अंतरीं दृढ। परमात्मरूपीं गूढ। बाह्य तरी रूढ। लौकिकु जैसा।।"** आणि, **"मार्गाधारें वर्तावें। जन हे मोहरे लावावे। अलौकिक नोहावें। लोकांप्रति।।"** ह्या संत ज्ञानेश्वरांच्या ओंव्यांचे प्रत्यक्षिकच त्यांच्या जीवनांत दिसून येते. अशा प्रकारे त्यांनी केलेल्या कार्याच्या व्याप्तीचे अनुमानही करणे दुरापास्त आहे. हजारों आर्त, अर्थार्थी आणि जिज्ञासू त्यांच्याकडे मार्गदर्शनासाठी येत. त्यांना त्यांनी कधीही निराश केले नाही. "अधिकार तैसा करूं उपदेश" या संतवचनानुसार "बहुतांची अंतरे" त्यांनी राखली. सर्वांचे प्रश्न अत्यंत आत्मीयतेने ऐकून त्यांना मार्गदर्शन केले. त्यांचा पत्रव्यवहारही प्रचंड होता. आपल्याला येणारी पत्रे काळजीपूर्वक वाचून त्यांना उत्तरे देण्याचा त्यांचा कटाक्ष होता. आपण त्यांच्या दीक्षाकार्याचा थोडा विचार आपण आधी केला आहे. पण शक्तिपात दीक्षेशिवायही पारंपरिक दत्तोपासना, हठयोग, भक्तियोग, कर्मयोग इत्यादि अनेक उपासनांचे मार्गदर्शन त्या त्या प्रवृत्तीच्या साधकांना त्यांच्याकडून लाभलेले आहे. हे सर्व कार्य सहज, शांतपणे आणि निरंतर झाले आहे. त्यांच्याशिवाय इतर कुणालाही त्याचा आंवाका कळणे अशक्य आहे. कांही प्रातिनिधिक घटना इथे दिल्या आहेत.

अन्ननलिकेचा कर्करोग झालेले एक भक्त सहकुटुंब आले होते. दोन-तीन आठवड्यांपासून त्यांच्या घशांतून अन्नाचा एक घासहि उतरला नव्हता. महाराजांनी त्यांना आपल्या पंक्तीलाच जेवायला बसविले. काय आश्चर्य, ते गृहस्थ जेवले. इतक्या दिवसांनी पोटांत अन्न गेल्याने ते गंहिवरून गेले.

अशा घटना नित्य घडत होत्या. कु.सरोज गांधी १२ वर्षे दुर्धर व्याधीने विकलांग होऊन अंथरुणावरच खिळल्या होत्या. श्रीगुरुमहाराज

त्याच्या घरी जाऊन त्यांना भेटून तासभर थांबून गेल्यावर त्यांच्या प्रकृतीत फरक पडल्या आणि कालांतराने त्या पूर्ण बऱ्या झाल्या.

गु.भ. ज्ञानेश्वर (माउली) काळे यांची नवविवाहित कन्या दूरगांवी तापाने आजारी असतांना तिला तिथे श्रीगुरुमहाराजांचे दर्शन झाले. तिने पत्रांतून हे वडिलांना कळविल्यावर त्यांनी महाराजांना प्रत्यक्ष दर्शनाच्या वेळी महाराजांना “खरेच आपण तिथे गेलां होतां कां?” असे विचारले असतां महाराज किंचित् हंसून म्हणाले, “तुमची मुलगी खोटे लिहील का?”

महाराजांचे सोलापूर येथील एकनिष्ठ भक्त श्री.शरणप्पा मनगुळे यांची ७-८ वर्षांची मुलगी एकदां वरच्या मजल्यावरून खिडकींतून खाली पडली. सगळे जण धांवत खाली गेले व पाहतात तर तिला किंचितसुद्धां इजा झाली नव्हती. तिला विचारले असतां ती म्हणाली, “महाराजांनी मला हातांत धरले. आत्तां इथेच होते महाराज!” अगदी निर्वाणाच्या दिवशी व पूर्वदिवशींही त्यांनी अनेक भक्तांना सदेह दर्शन दिल्याच्या घटना त्या त्या भक्तांनी नोंदविलेल्या आहेत.

काशीचे गु.भ.जांबुवंतसिंह यांन श्रीलोकनाथतीर्थस्वामींची केलेली अपूर्व सेवा सर्वश्रुत आहे. ते एकदां बागलकोट (कर्नाटक) येथे व्यापारानिमित्त गेले असतां त्यांना हृदयविकाराचा झटका आला. अनोळखी ठिकाणी उपचारासाठी रुग्णालयांत राहिले. त्यावेळी त्यांच्या खोलीच्या खिडकींतून महाराज आलेले त्यांना दिसले. तीन-चार दिवस महाराज त्यांची शुश्रूषा केली. त्यांनी त्यांना विचारले, “आपण कोण आहांत? कुणी यक्ष, देव वा आणखी कांही?” तेव्हां महाराजांनी आपले नांव घेऊन तेच आपण असल्याचे सांगितले. त्या वेळी महाराज पुण्यांत होते. जांबुवंतसिंहांनी लगेच पुण्याला जाऊन ही हकीकत सांगिली. महाराज नुसते हंसले.

महाराजांकडे अनेक प्रापंचिक आणि पारमार्थिक प्रश्न घेऊन येत. बऱ्याच वेळां प्रश्न मनाशी ठरवून आलेले लोकही प्रश्न विचारायला बिचकत असत किंवा संकोच करीत. अशा वेळी कांही लोकांना त्यांच्या प्रश्नाची उत्तरे न विचारतांच मिळालेली आहेत. पडतुरे नांवाचे आमचे एक आप्त यांचा

अनुभव चिंतनीय आहे. त्यांना अरबी देशांत नोकरी मिळाली होती. पण असलेली चांगली नोकरी सोडून ती घ्यावी किंवा नाही अशी मनाची द्‌विधा अवस्था झाली होती. शेवटी त्यांनी महाराजांना विचारावे असे ठरवून ते आश्रमांत आले. महाराजांचे दर्शन घेऊन बसले. पण सर्व लोकांच्यामध्ये आपला वैयक्तिक प्रशन त्यांना काढतां येईना. गोष्टी चालू होत्या व त्यांतच कांही संदर्भ निघून महाराज म्हणाले, “**साहसे श्री प्रतिवसति।**” आणि एकदम पडतुरेंच्याकडे बघून म्हणाले, “हे तुमच्यासाठी आहे बरं कां**?**” पडतुरेंनी तीच आज्ञा समजून परदेशगमन केले व त्यांना चांगला आर्थिक लाभ झाला.

आणखी एक आमचे मुंबईचे आप्त आपल्या मुलीशी विवाहासंबंधी मतभेदांमुळे चिंतित होते. ती त्यांच्या पसंतीच्या मुलाशी लग्न करायला तयार नव्हती. त्यांची श्रद्धा पावसच्या स्वामी स्वरूपानंदांवर असल्याने तिकडे गेले. पण त्यांची प्रकृति बरी नसल्याने ते कुणाला भेटत-बोलत नव्हते. कुणी तरी सुचविल्याने ते परत जातांना पुण्याला थांबले व आश्रमांत महाराजांच्या दर्शनाला आले. आपला प्रश्न त्यांनी एका चिठ्ठीवर लिहून आणला होता. पण महाराजांपुढे विषय काढायला त्यांची जीभ वळेना. दर्शनानंतर थोडा वेळ चुळबुळ करीत ते तिथेच बसले. मग महाराजच एकदम म्हणाले, “अहो काढा ती खिशांतली चिठ्ठी.” मग त्यांनी आपली समस्या महाराजांपुढे मांडली. महाराजांनी त्या मुलीला घेऊन यायला सांगितले. पुढे ते मुलीला घेऊन आल्यावर महाराजांनी त्या मुलीला समजावले, “बाळ, आई-वडील आपल्या हिताचाच विचार करतात. त्यांचे ऐकावे. त्यांतच तुझे हित आहे.” आणि आश्चर्य म्हणजे त्या मुलीने लगेच आपला आग्रह सोडून आपण वडील सांगतील त्या मुलाबरोबर लग्न करायला तयार असल्याचे सांगितले.

वर कांही प्रातिनिधिक घटना आठवतील तशा लिहिल्या आहेत. अशा घटना श्रीगुरुमहाराजांच्या आसपास किंवा दूरवरसुद्धां घडत होत्या. साधनेतील अनुभव तर दीक्षा झालेल्या शिष्यांना नित्यच येत होते. दीक्षा न झालेल्या भक्तांनासुद्धां असे अनुभव आलेले आहेत. स्वप्नांत, साधनांत किंवा

जागृतावस्थेतही श्रीगुरुमहाराजांचे दर्शन, संभाषण, आदेश इत्यादि अनुभूती शेंकडो साधकांना आलेले आहेत. ह्याविषयी श्रीगुरुमहाराज सांगत असत की, "हे अनुभव ज्याच्या त्याच्या श्रद्धेनुसार येत असतात. आम्ही कांही कुणाच्या स्वप्नांत जात नाही. परमेश्वरच भक्ताची जशी श्रद्धा असेल तसे रूप धारण करून दर्शन आणि फल देतो." कांही श्रद्धावान भक्तांना नरसोबावाडीच्या किंवा कुरवपूरच्या पादुकांचाया ठिकाणी श्रीगुरुमहाराजांचे दर्शन झाले. त्यावर महाराजांनी "ही त्या श्रीपादश्रीवल्लभांची कृपा आहे", असे उद्‌गार काढले. अर्थात इतक्या सर्व भक्तांच्या श्रद्धेला अधिष्ठानभूत श्रीगुरुमहाराजच होते हे ते सांगत नसत. होते हा शब्दप्रयोगही चुकीचाच आहे. कारण असे अनुभव घेणारे श्रीगुरुमहाराजांच्या देहत्यागानंतर चाळीस वर्षांनीसुद्धां अनेक साधक आजही आहेत. नश्वर देहाच्या सीमा पार करून जो शाश्वत स्वरूपांत स्थिरावतो त्यालाच संत असे म्हणतात. हे संत देशकालाच्या मर्यादांनी बांधले जात नाहीत.

**संत कृपेची साउली। ही केवळ माउली।**
**न घटे न वाढे जी भली। जीभली जी ईश्वराची ती कीं।।**

श्रीदत्तमाहात्म्य ३८:५९

श्रीगुरुमहाराजांच्या आपल्या तपःपूत, निःस्वार्थी, समर्पित जीवनाद्‌वारा सर्व भक्तांवर धरलेली ही कृपेची सांवली, ही अक्षय आणि परिपूर्ण भगवंताची जिह्वा, सर्व शिष्यांना, भक्तांना आणि अनुग्रहीतांना सर्व काळी, सर्वां ठायीं स्वात्मसौख्य प्राप्त करून देत राहील **!**

**तीर्थानां परमं तीर्थं तारकाणां च तारकम्।**
**सद्‌गुर्वाख्यं महातीर्थं भजामि परमार्थदम्।।**

श्रीगुरुचरणारविंदयोरर्पणमस्तु।

श्रीगुरुदेव दत्त।